# ISLAMCHI NAITIK CHETNA
(PAVITRA KURAANACHYA SANDARBHAT)

# इस्लामची नैतिक चेतना

## पवित्र कुरआनच्या संदर्भात


* लेखक *

अमर पाल सिंह

* भाषांतर *

मुबारक हुसेन मनियार

*॥ अल्लाह, असीम दयावंत व कृपावंतच्या नावाने ॥*

# दोन शब्द

काही विद्वानांना दिव्य कुरआनच्या शब्दांचे अर्थ चांगल्या प्रकारे कळतात व काही विद्वानांना त्याच्या भावनेचे उत्तम आकलन होते. असले लोक अत्यंत तुरळक आहेत की ज्यांना शब्द आणि त्याच्या भावना अशा दोघांचे समान आकलन होते. शब्द शरीर आहे आणि भावना आत्मा. ज्या विद्वानांना त्याचे शब्द कळतात त्यांना पवित्र कुरआनचे शरीर कळते. ज्या विद्वानांना त्याच्या भावनांचे आकलन होते त्यांना दिव्य कुरआनचा आत्मा कळतो. बुद्धीने शरीर कळते आणि विवेक अथवा प्रज्ञेने आत्म्याचे ज्ञान होते. दिव्य कुरआन एक धार्मिक ग्रंथ आहे, आध्यात्मिक ग्रंथ आहे. धर्म बुद्धीप्रधान कमी व भावनाप्रधान अधिक असतो. बुद्धीचा विषय तर्क व दृश्य प्रमाण आहे आणि आत्म्याचे क्षेत्र भावना व अदृश्य जग आहे. शब्द मानवाच्या अंतर्जगातील भावनांना पूर्णपणे व्यक्त करू शकत नाहीत. शब्द सामर्थ्य ससीम आहे, मर्यादित आहे आणि भावना शक्ती असीम व अमर्यादित. ससीमच्या माध्यामाने असीमपर्यंत पोचणे शक्य नाही, त्या दिशेने केवळ थोडीशी वाटचाल केली जाऊ शकते. मानवाला शब्द तितके महत्वाचे नाहीत जितक्या भावना महत्वाच्या आहेत. शरीर तितकेसे महत्वाचे नाही जितका की आत्मा आहे. मानव शरीर व आत्म्याचा एक अद्भुत संमिश्रण आहे. जड व चेतनाच्या संयोगाच्या अनुपम मूर्तीचे नाव मनुष्य आहे. पवित्र कुरआन मानवाच्या

कल्याणासाठी एक अपौरूषेय ग्रंथ आहे. अल्लाहची वाणी आहे. यापासून अलिप्त राहणे स्वत:च्या हितापासून वंचित राहण्यास कारणीभूत ठरू शकते. म्हणून प्रत्येक माणसाची ही जबाबदारी आहे की त्याने आपल्या मनाची व मस्तिष्काची कवाडे उघडावीत व आपल्या प्रभुची प्रियवाणी व करुणामय आवाहन ऐकावे व त्या मार्गदर्शनापासून जीवन-ज्योत प्राप्त करावी.

*दुनिया की मुहब्बतने तो दीवाना कर दिया ।*
*खुद मुझको अपनी राहसे बेगाना कर दिया ।*

इहलोकाच्या (जगाच्या) प्रेमाने तर मला वेड लावून सोडले आहे. त्याने मला स्वत:ला आपल्या मार्गापासून अपरिचित करुन टाकले.

हजरत आदम (अलै.) यांच्या त्या वंशजांच्या सेवेत की ज्यांच्यात थोडी फार का होईना, अद्याप माणुसकी शिल्लक आहे, सादर समर्पित.

**अमर पाल सिंह**
लेखक

# लेखकाचा संक्षिप्त परिचय

प्रस्तुत पुस्तकाचे लेखक श्री. अमर पाल सिंह, एम.ए. (अर्थशास्त्र व भूगोल), एम.कॉम. उत्तर प्रदेशातील जिल्हा सुलतानपूरमधील मुक्काम करपी पोष्ट हमजापूर पठान येथील रहिवाशी आहेत. ई. सन. १९२७ मध्ये एका प्रतिष्ठित क्षत्रिय कुटूंबात त्यांचा जन्म झाला. त्यांनी आपले प्राथमिक शिक्षण ग्रामीण भागात पुरे केले व उच्च शिक्षण कानपूर शहरात प्राप्त केले. त्यांनी आजपर्यंतचे आपले जीवन एक प्रतिष्ठित शिक्षक म्हणून घालवले. ते राजा हरपाल सिंह स्नातकोत्तर कॉलेज सिंगरामऊ जोनपूरमध्ये अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून दीर्घकाळपर्यंत कार्यरत राहिले आणि तेथूनच ई. स. १९८८ मध्ये सेवानिवृत्त झाले. आपल्या अध्यापन काळात त्यांनी अनेक पुस्तके सुद्धा लिहिली जी वाचकांत भरपूर लोकप्रिय सुद्धा झाली. त्यांनी 'हिंदुत्वाचे आर्थिक आधार' नावाचे एक पुस्तक लिहिले आहे जे प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

आपल्या जीवनाच्या संध्यासमयी त्यांची रुचि मानवधर्माबद्दल प्रगाढ होत चालली आहे, ज्याचे अंकुर बालपणातच उगवले होते. ते सर्वच मानवीय धर्मात एकात्म भावनेचे दृष्टा आहेत. आणि या भावनेमुळेच हे पुस्तक लिहिण्याचे प्रशंसनीय कार्य सिद्धीस पोचले आहे. ते हिंदु धर्मीय असून देखील त्यांचे इस्लामवर प्रेम आहे. त्यांचे मन आहे की विभिन्न धार्मिक मतभेदांना मूठमाती देण्यास योग्य काळ आलेला आहे. आज लोकांची सांस्कृतिक चेतना जागृत झाली आहे आणि संस्कृतीचा विकास झाला आहे, मानवतेचे उत्थान झाले आहे. आत्मिक क्षेत्रात मनुष्य आता पूर्वीपेक्षा अधिक तीव्र गतीने काही शिकण्यासाठी, काही ज्ञान मिळविण्यासाठी पुढे येत आहे. त्याची जिज्ञासा, आकांक्षा तीव्र होत चालली आहे. आधुनिक ज्ञान-विज्ञानाच्या प्रगतीने सुध्दा अनेक प्राचीन दंतकथा, अंधविश्वास आणि कल्पित मान्यतांचे पितळ

उघडे पाडले आहे. मानवाने जर बुध्दी विवेकाचा प्रयोग केला तर सत्य व असत्याची पारख त्याला सहजपणे करणे शक्य आहे. जो स्वतःच आंधळा म्हणून राहू इच्छितो त्याला कोणीही प्रकाश प्रदान करू शकत नाही. सर्व धर्मात ईश्वरी शिकवणी आणि मानवहिताची अमूल्य रत्ने विद्यमान आहेत. परंतु त्यांच्यात नंतरच्या काळात ज्या विकृति आलेल्या आहेत त्यांचा तौलनिक अभ्यास व मूल्यमापन करण्याची कसोटी व तराजू दिव्य कुरआन आम्हाला उपलब्ध करून देतो. इस्लाम काही वेगळा धर्म नाही. हा सर्व ईश्वरी धर्मांच्या मौलिक शिकवणींचे समन्वय व त्यांच्या विकृतींचा उच्छेद करतो. आणि याच कारणास्तव पवित्र कुरआनचे एक नाव 'मुहैमिन' (रक्षक) असे सुद्धा आहे. दिव्य कुरआन अशा समन्वयाचा विरोधी आहे ज्यात सत्य-असत्य, न्याय-अन्याय, समानता-भेदभाव, एकेश्वरवाद-बहुदेववादसारख्या परस्परविरोधी मान्यतांची पुष्टी केली गेली असेल. दुर्दैवाने आज अशाच समन्वयाचे ध्वजवाहक लोकांना पथभ्रष्ट करीत आहेत.

आम्हाला आनंद वाटतो की प्रस्तुत लेखक महाशयांनी अनमोल रत्नाची पारख केली आहे आणि ईश्वरी ग्रंथ दिव्य कुरआनवरून त्याची पुष्टी करून लोक कल्याणासाठी प्रस्तुत करण्याचे सौभाग्य प्राप्त केले आहे.

वाचकांना विनंती की त्यांनी सदर पुस्तकाचे सहानुभूतिपूर्वक अध्ययन व मनन करावे आणि जर या शिकवणी उपयुक्त वाटल्या तर त्याप्रमाणे आपले जीवन बनविण्याचा चांगला प्रयत्न करावा. अल्लाहने त्यांना यशस्वी करावे.

**मुहम्मद फारूक खान**

दिनांक २६ जानेवारी १९९५ ई. स.

# एक निवेदन

प्रस्तुत पुस्तकाचा एकमेव उद्देश असा आहे की मानवजातीशी संबंधित इस्लाम धर्माच्या नैतिक चेतनेशी प्रत्येक व्यक्तीला परिचित केले जावे. जेणेकरून तिने आपल्या जीवनाला सुधारण्यासाठी व सुशोभित करण्यासाठी ह्या चेतनेचा उपयोग करावा. आम्हाला वर्तमान पाश्चात्य सभ्यतेच्या दुर्बलतेचा आभास होऊ लागला आहे आणि त्या नैतिक शिकवणीवरून विश्वास हळूहळू उडू लागला आहे. अनेक लोक असे इच्छितात की त्यांच्यापासून लवकरात लवकर मुक्ती मिळावी ज्या त्यांच्यावर वर्तमान पाश्चात्य संस्कृतीने थोपल्या आहेत. या पुस्तकांत या बाबतीत व्यक्तीला मार्गदर्शन सुद्धा प्राप्त होईल आणि प्रकाश सुद्धा मिळेल अशी आशा आहे.

या पुस्तक-लेखनात आमचा असा प्रयत्न राहिला आहे की इस्लाम धर्माच्या नैतिक चेतना प्रदर्शित करताना पवित्र कुरआनचे आदेश, त्याच्या शिकवणीचे शाब्दिक अर्थच केवळ प्रस्तुत केले जाऊ नये, तर त्याच्या भावनात्मक हेतूला देखील व्यक्त केले जावे जो अधिक महत्वपूर्ण आहे. आमच्या विचार व मनन करण्यासाठी नैतिक शिकवणी संपूर्ण कुरआनमध्ये जागोजागी विखुरलेल्या आहेत. आम्ही ह्या सदर पुस्तकात एकत्रित करून विषयानुसार त्यांचे वर्गीकरण करण्याचा लहानसा प्रयत्न केला आहे.

प्रिय वाचकासमोर आमचे नम्र निवेदन आहे की आम्हाला अरबी भाषेचे अद्याप अल्पसे देखील ज्ञान नाही. अरबी भाषेच्या समुद्रतटावर अबोध बालकाप्रमाणे काही खडे-धोंडे वेचण्याचा प्रयत्न करीत आहोत. इस्लाम धर्माच्या संपर्कात येणे हिंदी, उर्दू व इंग्रजी भाषांच्या माध्यमानेच शक्य झाले. आम्हाला अरबी भाषेच्या पुस्तकांचे या भाषांमध्ये झालेल्या भाषांतरावरच समाधान मानावे लागले. त्यात जेथे परस्पर विसंगती आढळल्या तेथे आपल्या चिंतन व मननाचा लाभ घेतला आणि विवेक,

तर्क व प्रमाणाच्या कसोटीवर ज्या सत्य, शुध्द व खऱ्या उतरल्या त्यांचा स्वीकार केला. म्हणून या पुस्तकात जर एखाद्या ठिकाणी काही त्रुटी असेल तर वाचकांनी सद्भावनापूर्वक आम्हाला त्याबद्दल क्षमा करावी आणि आमची चूक आम्हाला कळविण्याचे कष्ट घ्यावे. दिव्य कुरआनशी आमचा हा अल्प परिचय देखील जर वाचकांना काही लाभ पोहचवू शकला तर त्याला आम्ही आपले सौभाग्य समजू.

या पुस्तकात वाचकांना जर एखाद्या जागी काही शंका उत्पन्न झाली अथवा काही प्रश्न पडला तर त्यांनी पवित्र कुरआनचे अचूक ज्ञान असलेल्या अरबी भाषेच्या विद्वानाशी संपर्क साधावा आणि आपले समाधान करून घेण्याची कृपा करावी व ते तथ्य आम्हाला कळविण्याची मेहरबानी करावी.

प्रिय वाचकहो ! आपण इस्लाम धर्माच्या नैतिक शिकवणी ग्रहण कराव्यात आणि त्यांना आपल्या जीवनात आणण्याचा संकल्प व प्रयत्न करण्याचा शीघ्र निर्णय घ्यावा, असा जर कोणी आपल्यावर दबाव आणला तर ते योग्य ठरणार नाही. आपणास स्वातंत्र्य आहे की आपण पूर्णपणे विचार व मनन करून स्वेच्छापूर्वक एखादा निर्णय घ्यावा आणि त्यावर तोपर्यंत टिकून रहावे जो पर्यंत आपणास सत्याचा एखादा अन्य मार्ग आढळत नाही. इस्लाम धर्माच्या बाबतीत एखादा विचार, मत अथवा निर्णय घेण्यापूर्वी आपण स्वत:शी असा प्रश्न करावा की इस्लाम धर्माविषयी आपणास पुरेसे ज्ञान प्राप्त झाले आहे का ? आपण निष्पक्ष भावनेने, व्यवस्थित व विधिवत इस्लाम धर्मावर मनन व विचार करावा. हे आपल्यावर अवलंबून आहे की पुढचे पाऊल काय असावे ? निवड करण्याच्या आपल्या अधिकाराचा व ईश्वरदत्त बुद्धीचा विचार व चिंतनात प्रयोग करण्याच्या आपल्या सामर्थ्याचा आम्ही सदैव आदर करतो. प्रत्येक माणसाची स्वत:ची इच्छा असते. कोणीही आपणाकडून आपली इच्छा हिरावून घेऊन अल्लाहच्या इच्छेसमोर समर्पित करण्यास भाग पाडणार नाही. आपणास स्वत:लाच सत्य व नैतिक मार्गाचा शोध

करावयाचा आहे जो आपणास, मानवाला, त्याच्या उच्चतम लक्ष्यापर्यंत पोहचवू शकेल आणि स्वत:चा निर्णय घ्यावयाचा आहे की आपण नैतिकतेच्या बाबतीत कोणती नीति अवलंबावी. सत्य आणि नैतिकतेच्या दिशेने होणारा आपला बौद्धिक प्रवास आपणास सुखदायी व मंगलकारी सिद्ध होवो हीच आमची सदिच्छा !

या पुस्तकाच्या लेखनात आम्हाला आदरणीय मुहम्मद फारुक खान, जे इस्लाम धर्माचे एक मान्यवर विद्वान आहेत, यांचे विशेष सहकार्य प्राप्त झाले आहे. त्यांच्या कृपेच्या अभावात हे पुस्तक पूर्ण करणे शक्य नव्हते. आम्ही त्यांचे विशेष आभारी आहोत. त्यांच्याशी व्यक्तिगत व वैचारिक रूपाने संपर्क स्थापित करून त्यांच्या ज्ञान, सूचना व सम्मतीचा आम्ही पूरेपूर लाभ घेतला आहे. सदर पुस्तक प्रकारान्तराने त्यांचीच कृती व अल्लाहची कृपा समजणे अधिक योग्य ठरेल. या पुस्तकात ज्या काही चांगल्या गोष्टी आहेत त्या त्यांच्या आहेत आणि जे काही दोष आहेत ते आमचे समजावेत.

शेवटी अल्लाहजवळ प्रार्थना आहे की त्याने हा लघुप्रयत्न स्वीकार करावा आणि या संदर्भात आमच्याकडून ज्या उणीवा व त्रुटी झाल्या असतील त्यांची क्षमा करावी. तोच एक क्षमा करणारा व कृपा करणारा आहे.

विनम्र

**अमर पाल सिंह**

मुक्काम करपी, जि. सुलतानपुर
उत्तर प्रदेश

# विषय प्रवेश

आदिकाळापासून आधुनिक काळापर्यंत मानवी चिंतनाचा कणा खुद्द मानव राहिलेला आहे. मानवाचा विकास कशा प्रकारे व्हावा, त्याच्यात सर्वांगपूर्णता कशी यावी, मानवी मूल्यांची स्थापना कशा तऱ्हेने व्हावी वगैरे-वगैरे प्रश्नावर विचार केला जात राहिलेला आहे. याच्या परिणामस्वरूप जे व्यावहारिक समाधान समोर आले आहे ते आहे नैतिकता.

नैतिकतेचेच विकसित स्वरुप 'धर्म' आहे. जरी असे म्हणणे शक्य नाही की नैतिकता व धर्म एक दुसऱ्याचे पर्यायाची शब्द आहेत. तरी असे म्हणणे देखील योग्य नाही की धर्मात नैतिकतेशिवाय अन्य काही नाही, तथापि, नैतिकतेला प्रत्येक धर्माचा अनिवार्य भाग म्हणून मान्यच करावे लागेल. जगातील सर्व धर्मात नैतिकतेची उपस्थिती कोणत्या ना कोणत्या रूपात जाणवल्याशिवाय राहत नाही.

मनुष्याची महानता, नैतिकता, सदाचाराच्या पालनावर अवलंबून आहे. हीच ती संपत्ती आहे जिच्या आधारे माणसाला सृष्टीत श्रेष्ठत्व वर्चस्व प्राप्त झाले आहे. सृष्टीचा मुकूटमणि असण्याचा गौरव लाभला आहे. नैतिकतेचा आश्रय घेतल्यास तो आपल्या मन, बुद्धी आणि अहंभावनेला परिष्कृत, परिमार्जित करून तिला आत्मतंत्राच्या आलोकात आणून बसवितो.

अध्यात्म्याची संपूर्ण रचनाच सदाचाराच्या पायावर आधारित आहे. मनीषींनी याच्या महत्ता व उपयुक्ततेचे प्रतिपादन आपल्या लेखनात केले आहे. नैतिकतेच्या पालनावर सर्वाधिक भर दिला आहे. ते व्यक्तित्वाच्या विकासात आचरणाची शुद्धता व नैतिकतेला आधारशिला मानतात.

ज्या कार्याचा उद्देश मानव व्यक्तित्वाला उजाळणे, प्रगतिपथावर

अंग्रेसर करून आत्मविकासाच्या सर्वोच्च शिखरावर प्रतिष्ठित करविणे व सत्य स्वरूपांचा बोध करविणे असतो, त्यांना सदाचरण, नैतिक कर्म म्हणतात. सत्यासाठी केल्या गेलेल्या आचरणास मनीषींनी 'सदाचरण' आणि 'नैतिकता' असे नाव दिले आहे. ऋषि, महापुरुष व पैगंबर म्हणविले जाणाऱ्या जीवनाच्या मर्मज्ञांनी नैतिकतचे महत्व ओळखून स्वत:ला सदाचार व नैतिकतेच्या साच्यात बसवून आपल्या व्यक्तित्वाला सुगठित, सुविकसित व सर्वांगीण बनविले होते. त्यांनाच मनुष्य नैतिकतेच्या प्रतिमूर्तिच्या रूपात स्वीकार करण्यास सहजपणे राजी होतो. त्याच सदाचार व नैतिक कर्माला प्रत्येक स्तराची मानसिकता बाळगणारे लोक स्वत:च्या स्थितीनुसार जीवनात त्याचा अवलंब करून विकासाच्या चरम उत्कर्षापर्यंत पोहचू शकतात. त्यांनी दान, दया व दमनाची अनेक उपयोगी उदाहरणे आपल्या उदाहरणाने प्रस्तुत केली. त्यांनी सत्य, तप, संयम व शांतीला आपल्या आचरणात समाविष्ट करण्यावर भर दिला आहे आणि स्वाध्याय व ज्ञानदान करण्यात मानवाचे कल्याण निहित असल्याचे सांगितले आहे. त्यांचा उपदेश आहे की मानवाचे प्रमुख अलंकार श्रध्दा, औदार्य व नम्रता आहे. ही सर्व कृत्ये नैतिकतेच्या विर्स्तुत क्षेत्रात समाविष्ट होतात. यांनाच जीवनात अवलंबिल्यास मानव जातीचे कल्याण होईल.

आत्मिक व भौतिक दोन्ही स्तरांतील प्रगतीत नैतिकतेच्या तत्वांचा समावेश आवश्यक आहे. त्याला कारण असे की कोणतीही व्यक्ती याच कसोटीवर स्वत:ला प्रामाणिक सिद्ध करते. हीच प्रामाणिकता लौकिक क्षेत्रात लोकांचा विश्वास व लोकांचे सहकार्य संपादन करते. आत्मिक क्षेत्रात मनुष्य याच आधारावर आत्मसंतोष व दैवी सहानुभूतीचा अधिकारी बनतो. स्वर्ग (जन्नत) मुक्ती वगैरेंमध्ये देखील याच प्रवृत्तीची प्रमुख भूमिका असते.

व्यक्तीच्या जीवनात जितके महत्व शिक्षणाचे आहे त्यापेक्षा कितीतरी अधिक महत्वपूर्ण स्थान नैतिकतेचे आहे. नैतिक गुणाशिवाय

माणसाचा सर्वांगीण विकास होणे शक्य नाही. याशिवाय कोणतेही शिक्षण उदात्त भावना व उत्कृष्ट चिंतन असलेला मनुष्य निर्माण करण्यात सदैव अयशस्वीच राहील. नैतिकतेच्या अवलंबनानेच मनुष्य सुसंस्कृत, आदर्श व चरित्रनिष्ठ नागरिक बनतो.

नैतिक नियमांचे निर्धारण करण्यासाठी ज्ञानोपार्जन अत्यावश्यक आहे. त्यासाठी अशी अट आहे की ते व्यक्तिवाद संकीर्ण चिंतनावर आधारित नसावे. ज्ञानार्जनासाठी व्यक्ती चिंतनशील व विवेकशील असणे आवश्यक आहे. चिंतन जीवनाचा सैद्धांतिक पक्ष आहे. त्याचा व्यावहारिक पक्ष श्रेष्ठ कर्मांच्या रूपाने परिलक्षित होतो. विचार मंथनाने जे सिद्धांत निश्चित होतात त्यांच्या सत्यतेच्या परीक्षेसाठी त्यांना व्यावहारिक क्षेत्रात कार्यान्वित करणे आवश्यक असते. उच्च आदर्श व्यवहारात येणे म्हणजेच नैतिकता होय. नीतिमान मनुष्य स्वतःच्या कल्याणाबरोबर समाजाचे सुद्धा कल्याण करतो. तो समाजातील लोकांशी सहानुभूति ठेवतो व त्यांना आपल्या उत्कृष्ट विचार व श्रेष्ठ व्यवहाराने निरंतर उंचावण्याचा प्रयत्न करतो. वास्तविकतः समाजापासून अलिप्त राहून माणसाच्या नैतिकतेचे मूल्य व उपयुक्तता काहीही राहत नाही.

वैयक्तिक जीवनात जिला नैतिकता म्हणतो तीच सामूहिक रुपाने विकसित झाल्यानंतर सामाजिक सुव्यवस्था बनते. प्रगती व समृद्धिची आणि सुख व शांतीची आधारशिला याच पृष्ठभूमीवर ठेवली जाते. पारिवारिक, सामाजिक मर्यादांचे पालन व श्रेष्ठ जीवन जगण्याच्या कलेचा मूळ आधार नैतिकताच मानली जाऊ शकते. नैतिकतेशिवाय राष्ट्रीय चरित्राचा विकास होऊ शकत नाही. धन नव्हे, वैभव नव्हे तर नैतिकताच मानवाची वास्तविक श्रेष्ठ संपत्ती आहे. नैतिकता सर्व स्वार्थी प्रवृत्तींचा विनाश करते. नैतिकतेचा मूळ आधार पूर्ण निःस्वार्थीपणा आहे.

# १. नैतिकता म्हणजे काय ?

या प्रश्नाचे उत्तर तितके सोपे नाही जितके की सामान्यपणे समजले जाते. जिच्यामुळे जास्त लोकांना जास्त सुख मिळते तिला नैतिकता म्हणतात. यात सचोटीपणा अपरिहार्य नाही. राजकारणी, व्यापारी व हेरगिरी करणाऱ्या मंडळींना सत्यापलिकडे जाऊन कार्य करावे लागते. काही विशिष्ट परिस्थितीत सामान्य जनतेला सुद्धा सत्यापासून दूर जाऊन स्वतःच्या कल्याणाखातर आणि दुसऱ्यांच्या कल्याणासाठी सुद्धा कार्य करणे भाग पडते. जसे ठक, चोर, दरोडेखोर व आतंकवाद्यांसी केला जाणारा व्यवहार याची उदाहरणे होत.

कार्याच्या स्वरूपाचा विचार करून देखील हे ठरविले जाऊ शकत नाही. कार्य करणाऱ्याचा हेतु व कार्याच्या परिणामाचा विचार करून हे ठरविले जाऊ शकते.

वास्तविकतः नैतिकतेचा संबंध जीवनाच्या समग्र स्वरूपाशी आहे. जर एखादी व्यक्ती एखाद्या बाबतीत नियम, आदर्श वगैरेंचे पालन करीत असेल व दुसऱ्या बाबतीत अनीतिचा व्यवहार करीत असेल व मर्यादांचे उल्लंघन करीत असेल तर तिला धार्मिकही म्हणता येणार नाही व नैतिकही म्हणणे शक्य नाही. नैतिकता म्हणजे चिंतन , चरित्र व व्यवहारात उच्च आदर्शांचे, मर्यादांचे पालन होय, केवळ व्यक्तिगत जीवनातच नव्हे तर सामाजिक जीवनात सुद्धा.

वाईट चिंतन व वाईट आचरण करणारा समाज केवळ आपल्यासारखाच नीच प्रवृत्तीच्या संततीला जन्म देत नाही. तर व्यक्तीमध्ये विद्यमान असलेल्या त्या विभूतींना (सद्गुणांना) सुध्दा अंकुरित

होण्यापूर्वीच नष्ट करून टाकतो. ज्या संभाव्य महानतेच्या स्वरूपात व्यक्तीमध्ये अगोदरपासूनच विद्यमान असतात.

उल्लेखनीय गोष्ट अशी आहे की प्रत्येक व्यक्तीमध्ये गुण व अवगुण समान रूपाने विद्यमान असतात. जर एखादा मनुष्य सद्गुणी असेल, नैतिक असेल तर याचे कारण केवळ असे आहे की त्याने आपल्या त्या विभूतीला प्रयत्नपूर्वक उंचावले आहे. प्रकट केले आहे, दृश्यमान केले आहे आणि दोषांना दाबून टाकले आहे, अव्यक्त केले आहे की ज्यामुळे तो लौकिक दृष्टीने सदाचारी, नैतिक ठरतो. त्याचे चांगले फळ त्याला परलोकातही प्राप्त होते आणि या जीवनात साफल्य मिळते. म्हणून प्रयत्न व पराक्रमाला सदैव नैतिकता व सदाचाराच्या दिशेत गतिमान ठेवले पाहिजे. जेणेकरून सुषुप्तीला जागृतीत परिवर्तित करून काही महान व महत्वपूर्ण गुण हस्तगत केले जाऊ शकतात आणि स्वत:ला अविस्मरणीय बनविले जाऊ शकते. धर्मतत्वाचे प्रशिक्षण व प्रसार केल्याशिवाय लोक जीवनाचा चारित्रिक, वैचारिक व नैतिक विकास होऊ शकत नाही.

इस्लाम धर्म नैतिक उत्थानाद्वारे जगात 'बंधुत्वाचा' प्रसार करतो. याच्या नैतिक दृष्टीत 'पर-कल्याणच' सर्वश्रेष्ठ व चरम उद्देश असतो. इस्लाम धर्माची ही स्पष्टोक्ती आहे की मानवाच्या उपलब्धींचे काहीही महत्व नाही तर त्याच्यात मूळ रूपाने निहित असलेल्या सद्भावनेचे आहे.ती आपल्या शेजाऱ्यांवर आपल्याप्रमाणेच प्रेम करण्यास प्रेरित करते. हीच आम्हाला चांगुलपणा व नैतिक उत्थानाच्या दिशेने नेते. माणसाला खऱ्या अर्थाने प्रेममय बनविणे. आपुलकी दाखविणारा बनविणे व त्याच्या नैतिक तत्वांना जागृत करणे हीच खरी मानवसेवा आहे. इस्लाम धर्म व्यक्तीचा विकास व त्याच्या चारित्र्य-निर्मितीद्वारे समाजाच्या कल्याणाचा

मार्ग प्रशस्त करतो. यात ध्यान, धारणा, समाधि, योग आणि साधनेवर फार भर न देता मनुष्याच्या नीति-निष्ठेला अधिक महत्व दिले आहे. आणि दोन्ही पक्षांत पूर्णतः संतुलन स्थापित केले गेले आहे. प्रेम आणि सौहार्दालाच नैतिकतेचे मूळ मंत्र मानले गेले आहे. खरी मनुष्यता प्राप्त करणारेच समाजाचे आदर्श शासक सुद्धा होऊ शकतात, अशी इस्लाम धर्माची मान्यता आहे.

इस्लाम धर्माने नैतिकतेचाच जीवनाच्या मुख्य आचरणाच्या रूपात स्वीकार केला आहे. श्रद्धा, ज्ञान व व्यवहार इस्लाम धर्माचे तीन महान रत्ने आहेत. व्यवहाराची विवेचना खुद्द संपूर्ण नीतिशास्त्र आहे. इस्लाम धर्म स्पष्टपणे म्हणतो की -

''पवित्रता या गोष्टीत नाही की आम्ही पूर्वेकडे तोंड करून अल्लाहची, ईश्वराची इबादत (भक्ती-पूजा) करतो की पश्चिमेकडे, तर पवित्रता या तथ्यात आहे. की आम्ही गरजू, गरीब, मोताद, प्रवासी, पाहुणे, शेजारी, नातेवाईक व समाजातील अन्य लोकांची किती सेवा करतो व त्यांना किती सहाय्य करतो.''

हीच माणसाची नैतिक जबाबदारी असल्याचे म्हटले गेले आहे. इस्लाम धर्माचा हा उद्घोष आहे की -

''तुमच्यापैकी कोणी सुद्धा तोपर्यंत धर्मावर श्रद्धा ठेवणारा, ईमान (विश्वास) आणणारा म्हटला जाऊ शकत नाही. जो पर्यंत तुम्ही आपल्या बंधुसाठी सुद्धा तीच वस्तु, तशाच व्यवहाराची अपेक्षा करीत नाही. जशा व्यवहाराची तुम्ही स्वतःसाठी अपेक्षा करता. तुमच्या दृष्टीने जे असत्य आहे, वाईट आहे तसले आचरण दुसऱ्याबरोबर करू नका.''

येथे बंधु आणि दुसरे या शब्दांचा अर्थ व्यापक आहे, संकुचित परिघांत नाही.

इस्लाम धर्माचा प्रमुख ग्रंथ कुरआनच्या अनेक अध्यायामध्ये सदाचरण व समाज व्यवहारावर प्रकाश टाकलेला आहे. त्या उद्धरणांच्या अवलोकनाने ही गोष्ट स्पष्ट होते की इस्लाम धर्म नैतिकतेच्या प्रचार व प्रसारावर किती अधिक भर देतो. ही गोष्ट उल्लेखनीय आहे की इस्लाम धर्म आणि त्याचा प्रमुख ग्रंथ कुरआन कोणत्याही विशिष्ट देश, विशिष्ट जात अथवा विशिष्ट काळाचा ग्रंथ नाही. तो सार्वभौमिक व सार्वकालिक आहे आणि मानवजातीचे कल्याण त्याला अपेक्षित आहे. ही गोष्ट वेगळी की त्याचा प्रादुर्भाव अरबस्थानात आजपासून जवळजवळ चौदाशे वर्षापूर्वी झाला होता. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मानवजातीला सुख-शांति देणारा खरा व सरळमार्ग दाखविला. त्यांनी नैतिकतेचे जे नियम व तत्वे उघड केली आहेत त्यांचे पालन मानवाला सुख शांति व मुक्ति (स्वर्ग-जन्नत) देणारे एक साधन आहे जे सर्वसुलभ सुद्धा आहे. त्यांनी दाखविलेले काही नैतिक नियम जे दिव्य कुरानमध्ये जागोजागी सांगितले आहेत ते सर्व सुलभ सुद्धा आहेत. त्यांनी सांगितलेले काही नैतिक नियम, जे दिव्य कुरआनमध्ये सांगितले गेले आहेत, अवलोकनीय आहेत, मननीय आहेत व अनुसरणीय आहेत. यांचे संक्षिप्त अवलोकन आम्ही या पुस्तिकेत सादर करीत आहोत. विषय विस्ताराच्या भीतीमुळे यांची विस्तृत व्याख्या सदर लघु पुस्तिकेत केली जाणार नाही. कृपाळू वाचकांनी या उणीवेसाठी आम्हाला क्षमा करावी.

## २. नैतिक दोष जे दिव्य कुरआन काढून टाकू इच्छितो

★ दिव्य कुरआनच्या अध्याय क्र. २ च्या वचन (शिकवणी) क्र. २७ व अध्याय १६ ची वचन क्र. ९१ आणि अध्याय १७ च्या वचन ३४ मध्ये सांगितले गेले आहे की समाजातील कोणत्याही घटकाला, व अल्लाहला या जगात जे वचन तुम्ही द्याल ते कोणत्याही परिस्थितीत मोडू नका. हे तुमच्यासाठी सर्वात मोठे नुकसान सिद्ध होईल. अध्याय १३ च्या वचन २० मध्ये म्हटले गेले आहे की तुम्ही जी प्रतिज्ञा कराल ती कोणत्याही स्थितीत पूर्ण करा. करार भंग करू नका. अनुबंधाची पूर्तता करा.

नैतिकतेचे प्रकटीकरण मानव समाजात वाणी व व्यवहाराने होते आणि दोघांचे संबंध एकमेकावर अवलंबून आहेत. म्हणून इस्लामने वचनबद्धता व सत्याचे साक्षीदार बनण्यावर विशेष भर दिला आहे. इस्लाम हे कदापि सहन करू शकत नाही की माणसाने वचनभंग करावे, एखाद्याला फसवावे आणि कथनाविरुद्ध कृती करावी. क्षणिक व तुच्छ स्वार्थाच्या लोभाने माणसात हे दुर्गुण येतात. हे दुर्गूण दूर करण्याचा दिव्य कुरआन स्पष्ट आदेश देत आहे. आणि या व्यावहारिक पक्षाला ईमान (ईश्वरावरील दृढ श्रद्धा) व विश्वासाच्या सैद्धांतिक पक्षाला जोडून त्याच्या आधारशीलेला शक्ती प्रदान करतो.

★ अध्याय २ च्या वचन क्र. ८४, अध्याय क्र. २५ चे वचन क्र. ६८, अध्याय ४ चे वचन २९, अध्याय ६ चे वचन १५२ व अध्याय १७ च्या वचन ३३ मध्ये स्पष्ट आदेश आहे की नाहक (विनाकारण) एखाद्याचे रक्त सांडू नका. नाहक (विनाकारण) एखाद्याचे प्राण घेऊ नका.

या संदर्भात प्रयुक्त शब्द 'नाहक' विचार करण्याजोगा आहे.

कोणाचे रक्त सांडणे 'हक़' (सत्यावर अधिष्ठित) व कोणाचे नाहक (असत्यावर अधिष्ठित) याचा निर्णय आमच्या मते अल्लाहवर सोडून द्यावा. मनुष्य हक व नाहक, पुण्यपाप, चांगले वाईटचा निर्णय करू शकत नाही. कारण त्याच्या बुद्धी व विवेकाचे सामर्थ्य सीमित आहे. त्याची विचार करण्याची परिधी संकुचित आहे. याचा निर्णयकर्ता तर केवळ अल्लाहच आहे. म्हणून अल्लाहने स्वतः याचा निर्णय लावून मानवाचा भार कमी केला आहे. आता या बाबतीत 'हक' (सत्य) तेच आहे ज्याचा निर्देश ईश्वराने दिला आहे. सामान्यपणे असे म्हटले जाऊ शकते की जो तुमचे रक्त सांडण्यास तत्पर आहे अथवा एखाद्याचे रक्त सांडतो. त्याचे रक्त तुम्ही सांडू शकता हा तुमचा अधिकार आहे, सत्य आहे. जो एकाद्याचे रक्त सांडतो, ठार करतो, त्याला ठार करणे, मृत्यूदंड देणे सत्याधिष्ठित आहे, न्याय-संगत आहे. आणि तर्कसंगत सुद्धा. हा नैतिक नि ःम या जगातील सर्व प्राण्यांवर समान रूपाने लागू होतो. याचीच पुष्टी पवित्र कुरआन सुद्धा करतो. आमच्या मते हत्या किंवा फाशीची सध्याची कायदेशीर शिक्षा सुद्धा कोणत्याही गंभीर अपराधाची एकमेव सत्याधिष्ठित शिक्षा ठरू शकत नाही. याचे अनेक विकल्प सुद्धा असू शकतात. मृत्यूदंडाचा केवळ अखेरचा उपाय म्हणून प्रयोग करणे योग्य व सत्याधिष्ठित आहे. जेव्हा सर्व विकल्प अयशस्वी ठरतील तेव्हाच मृत्यूदंड फाशीची शिक्षा शेवटचा उपाय म्हणून स्वीकारण्यात यावी.

म्हणून मृत्यूदंड तेव्हाच दिला जावा जेव्हा शिक्षेचे अन्य प्रकार आपला परिणाम दाखविण्यात अयशस्वी ठरतील. तेव्हाच ते योग्य सुद्धा म्हटले जाऊ शकते नाहीतर ही गोष्ट मानवाचा केवळ गर्व ठरेल आणि अल्लाहच्या दरबारात तो शिक्षापात्र सुध्दा ठरेल.

याच संदर्भात अध्याय २ वचन १७८ आणि अध्याय ५ च्या वचन क्र. ३३ वर सुद्धा विचार करणे आवश्यक आहे. वचन १७८ मध्ये सांगितले गेले आहे की 'हे ईमानधारकांनो ! मारले गेलेल्या लोकांच्या बाबतीत, खून केले गेलेल्या लोकांच्या बाबतीत खुनाचा बदला बरोबरीने

व समप्रमाणात (किसास) घेणे तुमच्यासाठी योग्य ठरविले गेले आहे. स्वतंत्र व्यक्तीचा बदला (सूड) स्वतंत्र व्यक्ती इतका, गुलाम व्यक्तीचा बदला गुलामाबरोबर व स्त्रीचा बदला स्त्री इतका आहे.'

इतकी कठोर परंतु न्यायपूर्ण व्यवस्था देऊन अल्लाहला, पवित्र कुरआनला संतोषाचा अनुभव होत असेल असे वाटत नाही. त्याला कारण असे की पुढे याच वचनात मृत्यूदंडाची ही व्यवस्था 'खूपच मवाळ' केली गेली आहे. आणि आदेश दिला गेला आहे की 'जर एखाद्या मारेकऱ्याला मृताच्या आप्तेष्टांकडून (मृताच्या भावाकडून) काही क्षमा केली गेली, काही सवलत दिली गेली तर खुनी व्यक्तीला शिक्षा देण्यासाठी परंपरागत सामान्य नियमांचे पालन करण्यात यावे. रक्त सांडण्याची किंमत अथवा आर्थिक दंड, रक्त सांडल्याबद्दल मोबदला (खूनबहा) देण्याच्या उत्तम रीतीने पालन करण्यात यावे. ही तुमची पालनकर्त्याकडून एक दया दाखविण्याची सवलत आहे. असे असूनदेखील एखाद्याने अत्याचार केला तर त्याच्यासाठी (परलोकातील) दु:खद यातना ठरलेली आहे.

प्रथमत: बरोबरीची व्यवस्था 'जशास तसे' ची तरतूद व 'खून का बदला खून' या न्यायाने अल्लाहला संतोष वाटत नाही असे दिसते. कारण ही तरतूद त्याच्या क्षमाशील दयाळू व कृपाळू असल्याच्या त्याच्या महान गुणांच्या विरुध्द आहे. त्याला मानवाच्या व्यवहार, त्याच्या सदोष स्वभावाची पूर्णपणे जाणीव आहे. त्याला चांगल्या प्रकारे माहीत आहे की चुका करणे हा मानवाचा सहज स्वभाव आहे आणि क्षमा करणे अल्लाहचा ईश्वरीय गुण आहे. म्हणूनच परोक्ष रूपाने अल्लाह, पवित्र कुरआन मृतकाच्या आप्तेष्टाकडून खुन्याला क्षमा केली जावी असा आग्रह धरतो, आदेश देतो. तो आपल्या नरमाई व दयाळूपणाच्या गुणाकडे मृतकाच्या आप्तेष्टांचे लक्ष वेधतो. मानवीय स्वभावानुसार मृतक पक्षाचे एवढ्यावर समाधान झाले नाही तर तो त्या हत्या करणाऱ्याकडून रक्ताची किंमत, आर्थिक दंड किंवा रक्त सांडल्याबद्दल मूल्य वसूल करू

शकतो. अशा नीतीला अल्लाहने एक 'उत्तम' पद्धत ठरविले आहे.

वचन १७९ मध्ये वर्णन आहे की तुमच्यासाठी (मानवासाठी) किसास (बरोबरी-जशास तसे) ज्या योजनेत हे बुद्धिमान लोकांनो ! जीवनाचे रक्षण आहे की जेणेकरून तुम्ही सुरक्षित रहावे अर्थात तुमच्या प्राणाचे रक्षण होऊ शकावे.'

वरील दोन्ही वचनात योजनेचा प्रमुख उद्देश, मूळभावना, मानवी प्राणाचे रक्षण करणे होय. या संदर्भात आम्ही किसासच्या व्यवस्थेवर थोडा विचार करू. या व्यवस्थेत एकीकडे ठार झालेल्या माणसाचा तर प्राण जातोच आणि त्याचा परिणाम म्हणून दुसरीकडे एका हत्या करणाऱ्याचा जीव घेतला जातो. अशा प्रकारे दोन माणसांचे प्राण जातात. याला मानवी जीवनाचे रक्षण कसे म्हणता येईल ?

इतकेच नव्हे तर एक प्रश्न असा देखील आहे की जर एखाद्या गुलाम व्यक्तीने एखाद्या स्वतंत्र व्यक्तीला ठार केले तर त्या गुलामावर किसासच्या योजनेनुसार कशाप्रकारे सूड (बदला) उगविला जावा ? तसेच, जर एखाद्या स्त्रीने एखाद्या पुरुषाची हत्या केली तर समानतेच्या सिद्धांतानुसार त्या स्त्रीकडून कसा बदला घेतला जावा ? आणि जर त्या हत्या करणाऱ्या स्त्रीचा कोणीही पुरुष नसेल तर ही समस्या अधिकच बिकट बनते. हा प्रश्न तेव्हाच सुटू शकतो की जेव्हा एखाद्या अशा खुन्याला मृत्यदंड, फाशीची शिक्षा वगैरे न देता एखाद्या अन्य विकल्पाचा अंगिकार केला जावा, उदाहरणार्थ रक्ताचे मूल्य, आर्थिक दंड, रक्त सांडण्याचा मोबदला किंवा देशातून हकालपट्टी करणे वगैरे.

तथापि, असे समजूनच विचार करणे योग्य ठरेल की अल्लाहच्या योजनेत निश्चितपणे कोणता न कोणता विवेक लपलेला असतो. एखाद्या हत्या करणाऱ्यासाठी मृत्युदंडाच्या योजनेतदेखील त्याचा एक विवेक दिसतो. तो असा की प्राण घेणाऱ्यांपासून (एक असामाजिक तत्व, नको असलेली व्यक्ती) समाजाला व देशाला कायमस्वरूपी मुक्ती मिळते आणि

त्यामुळे समाजातील अन्य लोकांच्या प्राणाचे रक्षण होते. इतक्यावर सुद्धा 'किसास' बरोबरी-समानता व मृत्युदंडाचा संबंध अनिर्णितच राहतो.

अल्लाहलाच चांगले ठाऊक आहे की आजचा एखादा खुनी उद्या एक चांगला मनुष्य, समाजसेवक बनू शकण्याची आपल्यात क्षमता बाळगतो. तो भविष्यात कधीही दुसऱ्याची हत्या न करण्याची प्रतिज्ञा करू शकतो. खून केल्याबद्दल प्रायश्चित देखील करू शकतो. त्याच्यात सदाचारी मनुष्य बनण्याची अद्याप सुद्धा शक्यता उरलेली असणे शक्य आहे. एक वाईट जीवन कोणत्याही वळणावर केव्हाही एका सुंदर, सुशील जीवनाकडे वळण्याची शक्यता असते. म्हणून त्याच्या जीवनाचे सुद्धा रक्षण होणे आवश्यक आहे. त्याच्याकडून देखील भविष्य काळात समाजाचे कल्याण होणे शक्य आहे. म्हणूनच पवित्र कुरआन रक्ताचे मूल्य, आर्थिक दंड, रक्त सांडण्याबद्दल मोबदला वगैरे विकल्पांची तजवीज करतो. यामुळे मारेकऱ्याच्या प्राणाचे रक्षण सुद्धा होते आणि अपराध्याला शिक्षा देण्याचा उद्देश व्यक्तीमध्ये सुधारणा सुद्धा पूर्ण होऊ शकतो. अशा अनेक उदाहरणांनी सिद्ध केले आहे की लोकांनी आपल्या आगामी जीवनात सुधारणा केली आहे. महापुरुषांनी दाखविलेल्या मार्गावर चालणे मान्य केले आहे आणि आपल्या कृती व कार्याने समाजाचे अवर्णनीय कल्याण केले आहे. कोणती व्यक्ती केव्हा काय बनेल याची कल्पना केवळ अल्लाहलाच आहे. म्हणूनच त्याने प्रत्येक जिवाच्या संरक्षणाची व्यवस्था केली आहे. मग तो मनुष्य कसल्याही स्वभावाचा का असेना. प्रत्येकाकडून त्याला काही मांगल्याची आशा असते. अद्याप अल्लाह आदमच्या संततीकडून पूर्णपणे निराश झाल्याचे दिसत नाही. त्याला प्रत्येक जिवाचे मूल्य कळते म्हणून त्याने माणसाच्या प्राणाचे रक्षण करण्याचा विडा उचलला आहे. म्हणूनच अल्लाहने मानवाच्या खुनासंदर्भात मृत्युदंडापेक्षा रक्त सांडल्याबद्दल किंमत, आर्थिक दंड व प्राणाचे मूल्य घेण्यास अधिक चांगली रीत असल्याचे म्हटले आहे. परंतु असे असूनदेखील त्याने न्यायाच्या मर्यादेचा भंग होऊ दिला नाही,

कारण क्षमादानाची ही सवलत अल्लाहने मृत्यूमुखी पडलेल्या व्यक्तीच्या आप्तेष्टांच्या मर्जीवर अवलंबून ठेवली आहे. त्यांनी जर अशी सवलत देण्यास मंजुरी दिली नाही तर 'प्राणाचा बदला प्राण' च्या न्यायिक प्रक्रियेपासून कोणत्याही महानतम पदाधिकाऱ्याची शिफारसदेखील हत्या करणाऱ्याच्या प्राणाचे रक्षण करू शकत नाही.

या भौतिक जगात मानवाची सर्वात मूल्यवान संपत्ती त्याचे जीवन होय. कोणतीही संपत्ती त्याच्या मोबदल्यात दिली जाऊ शकत नाही. म्हणूनच खून करणाऱ्याचे प्राण घेऊन सूड घेतला जातो. असे केले गेले नाही तर कोणाच्याही प्राणाचे रक्षण करणे कठीण होईल. या शिक्षेने हत्या करण्याच्या शक्यतेचे प्रमाण शून्यावर आणले गेले आहे. म्हणूनच पवित्र कुरआनने 'किसास' (बरोबरीचा बदला) मध्ये विचारवंतासाठी जीवनाची स्थापना केली आहे. रक्त सांडल्याबद्दल मोबदला अथवा रक्ताची किंमत घेवून खुन्याला माफ केल्याने खुन्याला एक प्रकारे जीवनदान प्राप्त होतो. त्यामुळे भविष्य काळातील जीवनात सुधारणेचा मार्ग अवलंबिण्याची व स्वत:ला समाजासाठी हितकारी सिद्ध करण्याची एक अपूर्व सुवर्णसंधी खुन्याला प्राप्त होते. मकतूल (ज्याला ठार केले गेले) च्या वारसांना रक्ताची किंमत म्हणून एक मोठी रक्कम मिळते. खुन्याने जर प्रायश्चित केले आणि ठार झालेल्या व्यक्तीच्या वारसांना राजी केले तर यात सामाजिक दृष्टीने सुद्धा अनेक लाभ अंतर्भूत आहेत. हा क्षमादानाचा अधिकार ठार झालेल्या व्यक्तीच्या वारसांना देवून पवित्र कुरआनने न्यायासनाला मजबूत केले आहे. असे केले नसते तर न्यायाच्या मर्यादेचे उल्लंघन झाले असते. या बाबतीत न्यायाधीश अथवा सत्ताधाऱ्याला पवित्र कुरआन अधिकारशून्य बनवून न्यायभंग करण्याची सर्व कवाडे बंद करून टाकतो.

मृत्युदंडाच्या संदर्भात अध्याय ५ चे वचन ३३ व ३४ सुद्धा विचारणीय आहेत. वचन ३३ मध्ये म्हटले गेले आहे की, "जे लोक अल्लाह व त्याच्या पैगंबरांशी युद्ध करतात व जगात उपद्रव निर्माण

करतात त्यांची शिक्षा हीच आहे की त्यांना निर्ममतेने ठार केले जावे अथवा सुळावर चढविले जावे. अथवा त्यांना देशातून हद्दपार केले जावे.''

या वचनात सत्याविरुध्द युध्द करणाऱ्यांना मृत्युदंड देण्याची किंवा देशातून हद्दपार करण्याची व्यवस्था आहे. या वचनाचा मुख्य उद्देश अशा अवांछनीय तत्वांना समाजातून कोणत्याही प्रकारे वेगळे पाडण्याचा आहे. असे आजीवन करावासाची शिक्षा देऊन सुद्धा केले जाऊ शकते की जेणेकरून समाजातील कोणीही व्यक्ती सत्याविरुध्द युद्ध करू शकणार नाही. मृत्यूदंडाला अखेरचा उपाय म्हणूनच अवलंबिणे अधिक योग्य आहे. पुढील वचन क्र. ३४ मध्ये आदेश दिला गेला आहे की जेथपर्यत शक्य आहे तेथपर्यंत 'तौबा'' (पश्चात्ताप) करविण्याची व्यवस्था केली जावी. तौबा केल्यानंतर अशा व्यक्तीला क्षमा करण्याची आज्ञा अल्लाहने दिली आहे.

अध्याय ५ चे वचन ४५ वर देखील विचार करणे योग्य ठरेल. या वचनात व्यवस्था दिली गेली आहे की ''प्राणाबद्दल प्राण, डोळ्याबद्दल डोळा, नाकाबद्दल नाक आणि दाताचा बदला दात आणि अशा प्रकारे सर्व आघातासाठी बरोबरीचा बदला आहे. म्हणून जर त्याला क्षमा केली गेली तर हे त्याच्यासाठी प्रायश्चित्त होईल.''

या वचनात 'जशास तसे' च्या सिद्धांताचे प्रतिपादन केले गेले आहे. न्यायिक जगताचा हा एक प्रमुख सिद्धांत आहे की ज्यात बुद्धीला प्राधान्य व हृदयाला गौणत्व दिले गेले आहे. पुढे याच वचनात या संपूर्ण सिद्धांताला क्षमादान सिद्धांताने संतुलित केले गेले आहे. हे तर्कसंगत व न्यायसंगत वाटते.

मृत्युदंडासंबंधी अध्याय १७ चे वचन क्र. ३३ देखील विचारणीय आहे. यात आदेश आहे की ''कोणत्याही माणसाला ठार करू नका.'' सत्याशिवाय असे करणे अल्लाहने हराम (निषिद्ध) ठरविले आहे. याच

वचनात म्हटले गेले आहे की, "ज्याची हत्या नाहक केली गेली असेल त्याच्या वारसाला अल्लाहने अधिकार दिला आहे (की त्याने हत्या करणाऱ्याला क्षमा करावी, किंवा रक्ताची किंमत किंवा आर्थिक दंड त्याच्याकडून वसूल करावा अथवा जन्मठेपेची शिक्षा दिली जावी. अथवा त्याला मृत्युदंड देवून खुनाच्या बरोबरीने 'किसास' बदला वारसाने घ्यावा. परंतु खुनाच्या बाबतीत मर्यादेपलिकडे जाऊ नये. अत्याचार करू नये.) हा बदला घेण्यात (शासन व अल्लाह) त्याला मदत करतील."

येथे 'शासन मदत करील' चा अर्थ असा आहे की हत्या करणाऱ्याला ठार करण्याचे कार्य व त्यासंबंधीची न्यायिक कार्यवाही शासन (सरकार) पूर्ण करील. मृताचा कोणताही वारस हे करणार नाही. 'अल्लाह मदत करील' याचा अर्थ असा की जर राज्य सरकारला हत्या करणाऱ्याला शिक्षा करण्यात काही विशिष्ट कारणामुळे यश प्राप्त झाले नाही तर कियामत (प्रलय काळ) च्या दिवशी अल्लाह मृताला सहाय्य करील व हत्या करणाऱ्याला अवश्य यातना देईल.

उक्त वचनामध्ये प्रयुक्त शब्द 'सत्य' (हक) पासून तात्पर्य असा की काही विशिष्ट स्थितीतच पवित्र कुरआन राज्य शासनाद्वारे एखाद्या माणसाला मृत्युदंड अथवा फाशीची शिक्षा देण्यास वैध ठरवितो जसे (१) मुद्दाम एखाद्या माणसाची हत्या करणाऱ्याला. (२) सत्य-धर्माच्या मार्गात अडथळा आणणाऱ्याला. (३) इस्लामी राज्य उलथून पाडण्याचा प्रयत्न करणाऱ्याला.

उपर्युक्त पहिल्या प्रकारचे अपराधी असामाजिक तत्वे आहेत व ते अविवेकी सुद्धा आहेत. तृतीय प्रकारचे अपराधी देशद्रोही आहेत. दुसऱ्या प्रकारचे अपराधी विचारांचा व धर्म-स्वातंत्र्याचा विनाश करणारे आहेत. म्हणून अशा प्रकारचे अपराध करणारे लोक शिक्षेस पात्र आहेत. अशा प्रकारच्या लोकांपासून समाज, देश, राज्य व धर्माचे रक्षण करणे आवश्यक आहे. अशा लोकांना समाज व देशापासून वेगळे करणेच हितावह आहे. मग पृथक्करणाची पद्धत काहीही असू शकेल, जसे मृत्युदंड

देणे, देशातून हद्दपार करणे, तुरुंगात डांबणे, निर्जन स्थळी त्यांना वसविणे वगैरे. अशा तत्वापासून अशा प्रकारे मानवाचे रक्षण करणे नैतिकतेच्या अनुकूल आहे. उग्रवाद्याला व आतंकवाद्याला मृत्युदंड देणेच राज्याच्या दृष्टीने नैतिक कार्य होय. यांना मानव व मानवाधिकाराच्या क्षेत्रात आणून संरक्षण देणे अनैतिकता आहे.

म्हणून जेथपावेतो शक्य आहे तेथपावेतो मृत्युदंड, फाशीची शिक्षा व ठार करण्यापासून अलिप्त राहिले जावे. जर सर्वच विकल्प परिणामशून्य ठरले तर अति विशिष्ट व अति असाधारण स्थितीतच थोडक्याच विशिष्ट अपराधासाठी माणसाला ठार केले जावे किंवा फाशीची शिक्षा दिली जावी. क्षमादान अल्लाहला फारच प्रिय आहे जर त्यामुळे मानव समाजाचा कोणत्याही प्रकारे अहित होत नसेल.

★ अध्याय २ चे वचन १८८ व अध्याय ४ चे वचन २९ मध्ये सांगितले गेले आहे की फसवेगिरी करून, घोटाळा करून, बेईमानीने कोणाचा माल संपत्ती घेऊ नका. कोणालाही लाच देऊ नका आणि कोणापासून घेऊही नका. या वचनात म्हटले आहे की अनैतिक कमाईचा लाभ घेऊ नका. याचा उपभोग परमार्थात करणे सुद्धां हानिकारक सिद्ध होतो. जी प्राप्ती योग्य व उपयुक्त श्रम केल्याविना प्राप्त होते तिचा उपयोग हानिकारक ठरतो कारण यामुळे दुसऱ्यांना हानि पोचते. अशा प्राप्तीचा उपयोग केल्याने स्वार्थ सिद्धीही होत नाही आणि परमार्थही साध्य होत नाही. अयोग्य कमाई दान म्हणून देणे सुद्धा नैतिक नाही, त्याला कारण असे की देणाऱ्याच्या संपत्तीवर वैध अधिकार नसतो.

★ अध्याय २ चे वचन २६४ मध्ये आदेश दिला गेला आहे की कोणावर उपकार करून ते सांगून दाखवू नका. याबाबतीत देखावा अथवा प्रदर्शन करण्यापासून दूर रहा. येथे या गोष्टीवर भर दिले गेले आहे की स्वतः कोणीही सत्कार्य करीत नाही. अल्लाहची प्रेरणा त्याच्याकडून करविते. म्हणून उपकार अल्लाहचे

आहे त्या माणसाचे नाही. सत्कार्य करण्याचे साधन देखील अल्लाहचे आहे, माणसाचे नाही. म्हणून माणसाने त्याचे प्रदर्शन, देखावा अथवा जाहिरात करणे निरर्थक व मिथ्या आहे.

★ अध्याय ६ चे वचन १०८ व १०९ मध्ये असा निर्देश आहे की दुसऱ्यांच्या उपास्यांना वाईट म्हणू नका कारण न कळत ते सुद्धा तुमच्या उपास्यांना बरेवाईट म्हणतील. तुम्ही दुसऱ्यांच्या पूज्य देवतांना शिवी देऊ नका कारण याची प्रतिक्रिया वाईट सिध्द होऊ शकते. येथे परोक्ष रूपाने असे सांगावयाचे आहे की तुम्ही सर्व लोकांचा योग्य प्रकारे आदर करा. त्यांच्याबद्दल सहानुभूति बाळगा. कोणत्याही धर्माबद्दल विचार करताना औदार्य व शिष्टपणाकडे विशेष लक्ष द्या. भांडण करून कोणालाही वाईट कर्मापासून रोखता येणे शक्य नाही. आवेशात विवेक व बुद्धीसुद्धा निष्क्रीय बनते. म्हणून सत्याचे आवाहनदेखील अत्यंत नरमाई व सहानुभूतीने केले पाहिजे. एखाद्या हट्टी माणसाने तरी सुद्धा मान्य केले नाही तर त्याला त्या स्थितीत सोडून द्या. कारण सर्वांच्या कर्मांचे योग्य फळ देणारा अल्लाह आहे. मनुष्य आपल्या स्वत:च्या कर्मासाठी जबाबदार आहे दुसऱ्यांच्या कर्मासाठी नव्हे.

★ अध्याय ४ चे वचन ३७ व १२८, अध्याय १७ चे वचन २७ व अध्याय २५ चे वचन ६७ मध्ये म्हटले गेले आहे की अल्लाहला कंजूषपणा पसंत नाही. या संदर्भात असा सुद्धा निर्देश आहे की मन संकुचित ठेऊ नका. त्या बरोबरच असे सुद्धा म्हटले गेले आहे की वायफळ खर्च करू नका. यामुळे सैतानपणाला प्रोत्साहन मिळते. म्हणून या दोहोंमधील मध्यम मार्गाचा अवलंब करा. कंजूषपणा करू नका व वायफळ खर्च देखील करू नका. येथे हे तथ्य स्पष्ट केले आहे की माणसाने आर्थिक संयम बाळगावा.

★ अध्याय २२ चे वचन ३० व अध्याय २३ च्या वचन ३ व ४ मध्ये आहे की असत्य, खोट्या व वायफळ बडबडीपासून अलिप्त रहा. दुराचार व सैतानपणा जवळ फिरकू नका. त्यापासून नेहमी दूर रहा. पशुता, पिशाच्चपणाऐवजी, जबाबदारी, शौर्य, समंजसपणा व नेकीचा अंगिकार करून आध्यात्मिक प्रगतीच्या मार्गावर चला.

★ अध्याय २८ चे वचन (बोध वाक्य-वचन) क्र. १७ मध्ये सांगितले गेले आहे की अपराध्यांचे सहाय्यक व मित्र बनू नका. येथे या गोष्टीवर भर दिला गेला आहे की अपराधापासून अलिप्त रहा. परंतु अपराध्यांशी घृणा करू नका. त्यांच्यात सुधारणा घडवून आणावी अशी अपेक्षा आहे. ते धार्मिक रूपाने आजारी आहेत. त्यांचा औषधोपचार करा व त्यांच्यासाठी प्रार्थना करा, जेणेकरून ते धार्मिक रूपाने आरोग्यवान बनावेत. हे लक्षात ठेवावे की अपराध करण्यात त्यांचे सहकारी बनू नका. येथे 'अपराध' चा व्यापक अर्थ घेणे आवश्यक आहे. संकुचित अर्थ घेतला जाऊ नये. अपराध्यांना कोणत्याही प्रकारे व कोणत्याही स्थितीत मदत करणे अपराध आहे, पाप आहे.

★ अध्याय ४ चे वचन ३६, अध्याय २८ चे वचन ७६ व अध्याय ३१ च्या वचन १८ मध्ये म्हटले गेले आहे की निस्संदेह अल्लाह कोणत्याही अशा माणसाला पसंत करीत नाही जो मिरवणारा व गर्व करणारा आहे.

असा निर्देश आहे की अल्लाहने दिलेल्या देणग्यावर, बळ, बुद्धी व वैभवावर गर्व करू नका. या गोष्टी प्राप्त झाल्यास फुगून जाऊ नका. गर्वाने मिरवू नका व या पृथ्वीवर ऐटीत घमेंडीत चालू नका. नि:संशय अल्लाह कोणत्याही आत्मप्रशंसकाला व पोकळ बढाया मारणाऱ्याला पसंत करीत नाही. येथे असे सांगण्याचा हेतु आहे की या जगात सरळ साध्या-सुध्या चालीने चला. आपला आवाज हलका, सरळ, विनम्र व सर्वप्रिय बनवा.

★ अध्याय २४ च्या वचन ३३ मध्ये आदेश दिला गेला आहे की कोणत्याही स्त्रीला ऐहिक जीवनाचा लाभ, सुख प्राप्त करण्यासाठी वेश्या व्यवसाय करण्यास भाग पाडू नका. ज्यांना वैवाहिक जीवन जगण्याची संधी मिळाली नाही त्यांनी स्वत:ला संयमपूर्वक ठेवावे. अल्लाह अशांना आपल्या कृपेने आपल्या मेहरबानीने संपन्न करील. याच संदर्भात अध्याय १७ चे वचन ३२ व अध्याय २५ चे वचन ६८ मध्ये पुरुषांना व स्त्रियांना गुप्तांगांचे रक्षण करण्याचा सल्ला दिला गेला आहे. या वचनानुसार वेश्याव्यवसाय एक अनैतिक व अमानवीय कृत्य आहे. सारंश असा की यात पवित्र जीवन अंगिकारून वैवाहिक संबंध टिकविण्यावर भर दिला आहे.

★ अध्याय ७४ चे वचन ६ मध्ये वर्णन आहे की कोणावरही परतफेडीच्या आशेने उपकार करू नका. परोक्ष रूपाने येथे असे सांगितले गेले आहे की पुण्य कार्य करणे, मदत करणे, सद्भावना राखणे माणसाचे 'पावनकर्तव्य' आहे. कर्तव्य पालनाखातर त्याला कसलीही परतफेड अथवा मोबदला मिळता कामा नये. म्हणून त्याच्या बदल्यात काही प्राप्त करण्याची इच्छा सुद्धा बाळगता कामा नये. ईश्वराकडून मोबदल्याची आशा केली पाहिजे. यामुळे समाजातील गरीब वर्गाचे कल्याण होते व संपूर्ण समाज यामुळे उपकृत होतो.

★ अध्याय ७४ च्या वचन ५ मध्ये आदेश आहे की घाणेरडेपणापासून अलिप्त रहा. येथे घाणेरडेपणाचे तात्पर्य असे आहे की प्रत्येक गोष्ट जी मनुष्याच्या वास्तविक स्वभावाच्या प्रतिकूल असते व त्याला दूषित करते. कर्मसुद्धा घाणेरडे असतात, भाषादेखील घाणेरडी असते, विचार व भावना सुद्धा घाण असतात. या सर्व प्रकारच्या घाणीपासून दूर राहण्याचा आदेश दिला गेला आहे.

अध्याय ७४ च्या वचन क्र. ४ मध्ये म्हटले गेले आहे की, "आपले कपडे पाक (स्वच्छ) राखा." येथे अरबी भाषेतील वाक्प्रचाराचा प्रयोग केला गेला आहे. त्याचा अर्थ असा आहे की आपले चरित्र, आपले कर्म चांगले, स्वच्छ व शुचिर्भूत ठेवा. त्याचबरोबर आपल्या आत्म्याला सुद्धा स्वच्छ, पवित्र व निर्मळ ठेवा. आपले शरीर सुद्धा स्वच्छ ठेवा जे तुमच्या आत्म्याचे वस्त्र आहे, तेच याला झाकते, सुरक्षित ठेवते.

★ अध्याय २ चे वचन १५३ व अध्याय ७४ च्या वचन ७ मध्ये आदेश आहे की 'सहनशील व्हा' येथे परोक्ष रूपाने असे सांगावयाचे आहे की सन्मार्गावर चालताना अनेक अडचणी, अनेक प्रतिकूलता व अनेक कष्टप्रद परिस्थिती येतील त्यांना धैर्याने व सहनशीलतेने तोंड द्या. निस्संदेह अल्लाह धैर्य राखणाऱ्यांच्या बरोबर आहे. अध्याय ४२ चे वचन ७३ मध्ये सहनशीलता बाळगणे मोठ्या धैर्याचे कार्य असल्याचे म्हटले आहे. हे भ्याड लोकांचे आश्रयस्थान नव्हे. हा धैर्यवान लोकांचा अमोघ अस्त्र आहे. त्याने ते प्रत्येक अडचणीवर विजय प्राप्त करतात. तात्कालिक लाभावर लक्ष केंद्रित करणारे शेवटी नुकसानीत राहतात.

★ अध्याय ७४ च्या वचन नंबर २ मध्ये आदेश आहे की, "उठा व सावध करा." उठा आणि लोकांच्या चेतनेला जागृत करा. उठा, जागा व जागे करा, हाच तर तो महामंत्र आहे ज्याला संपूर्ण दिव्य कुरआनचा आत्मा म्हटला जाऊ शकतो. हाच तर आम्हाला नैतिकतेच्या मार्गावर चालण्याची प्रेरणा देतो, प्रोत्साहन देतो. आम्ही स्वत: उठावे, जागे व्हावे व त्यानंतर दुसऱ्यांना उठवावे, जागे करावे. हेच तर आमचे नैतिक कर्तव्य होय.

येथे लक्ष देण्याची गोष्ट अशी आहे की अल्लाहचे जे संबोधन

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यासाठी आहे, तेच सर्व लोकांसाठी आहे. तो मार्ग ज्यावर नबी (पैगंबर) चालत असत त्यावर चालण्याचा आदेश अल्लाहकडून त्यांना मिळत असे, तोच सर्व लोकांसाठी अनुकरणीय व पालनीय आहे.

★ अध्याय ८ च्या वचन २७ मध्ये स्पष्ट आदेश आहे की कोणाशी विश्वासघात करू नका आणि आपल्या ठेवी, जबाबदाऱ्यांच्या संदर्भात कपटीपणाचा अवलंब करू नका. कोणाची ठेव गिळंकृत करू नका. अध्याय २ च्या वचन क्रमांक २८३ मध्ये म्हटले आहे की ठेवीत अप्रामाणिकपणा दाखवू नका. अध्याय ४ च्या वचन ५८ मध्ये अल्लाहने आज्ञा दिली आहे की ठेवी त्यांच्या मालकांच्या स्वाधीन करीत जा. जर लोकांच्या दरम्यान निर्णय कराल तर न्यायपूर्वक निर्णय करा. येथे लक्ष देण्याजोगी गोष्ट अशी आहे की ठेवींचे मूळ तत्व विश्वास आहे, म्हणून विश्वासघात करू नका, ठेवीत अप्रामाणिकपणा दाखवू नका, हा आदेश आम्हाला नैतिक मार्गदर्शन आहे. येथे या गोष्टीवर बळ दिले गेले आहे की विश्वासघात, ठेवीत अप्रामाणिकपणा व निर्णय करण्यात पक्षपात करू नका.

★ अध्याय २४ चे वचन २३ व अध्याय ४९ चे वचन १२ मध्ये म्हटले गेले आहे की गैरसमज, कुतर्क करू नका. कुतर्क करणे पाप आहे. एखाद्याचे दोष व दुर्गूणांच्या पाळतीवर व शोधात राहू नका. यामुळे सामाजिक जीवनावर वाईट परिणाम होतो. याच वचनात असा सुद्धा आदेश आहे की कोणीही कोणाच्या पाठीमागे त्याच्या गैरहजेरीत त्याची निंदा, नालस्ती करू नये. ही निंदाही होऊ शकते व दोषारोपण सुद्धा.

एखाद्याचे ते दुर्गूण सांगितले गेले जे त्याच्यात नसतील तर ती 'तोहमत' (दोषारोपण) मिथ्यारोपण आहे. वर्णन केलेले दुर्गूण त्याच्यात असतील तर ती 'ग़ीबत' (निंदा) होय. या दोन्ही प्रकारच्या निंदा व

दोषारोपण नैतिकतेच्या विरुद्ध आहेत. यामुळे आपापसातील प्रेमभाव नष्ट होतो. या कर्माला आपल्या मृत भावाचे मांस खाण्याची उपमा दिली गेली आहे. म्हणून याला एक निंदा करण्याजोगे कर्म म्हटले आहे एक भयंकर अपराध सुद्धा. नैतिकता यास कधीही स्वीकार करीत नाही.

★ अध्याय ४९ चे वचन १३ मध्ये या तथ्यावर प्रकाश टाकला गेला आहे की या जगातील सर्व मानव एकाच स्त्री-पुरुषाची संतती होय. मानवामानवात जितक्या प्रकारचे भेदभाव आहेत पवित्र कुरआन ते आपल्या या सिद्धांताद्वारे नाहीसे करतो. रंग, रूप, वेष-भूषा, जात, वंश, राष्ट्र, हवापाणी, भौगोलिक परिस्थितीमुळे जे फरक, प्रकीर्णता, विविधता आढळतात, ते केवळ एकमेकाला ओळखण्यासाठी आहेत. अल्लाहच्या नजरेत सर्व समान आहेत. म्हणून आम्ही सुद्धा सर्वांना समान मानले पाहिजे आणि एका आई-बापाची संतती समजले पाहिजे. याच धारणेला स्थायी बनवून याच्या अनुरूप सर्वांनी आपापसात व्यवहार सुद्धा केला पाहिजे. माणसात श्रेष्ठ व आदरणीय व्यक्ती तीच आहे जिचे चरित्र, आचरण, नैतिकता व प्रामाणिकता मानवीय दृष्टिकोनाने सर्वात श्रेष्ठ आहे. आणि ती सर्वात अधिक अल्लाहवर प्रेम करते व त्याचे भय बाळगते.

★ अध्याय ४९ चे वचन क्र. ९, १० व ११ मध्ये निर्देश दिले गेले आहे की सर्व मानव आपसात भाऊ भाऊ आहेत. कोणीही कुणाशी भांडण, युद्ध करू नये. यदाकदाचित आपापसात भांडण अथवा युद्ध झालेच तर सर्वप्रथम असा प्रयत्न केला गेला पाहिजे की आपसात तह अथवा समझोता व्हावा. यात यश मिळाले नाही तर ज्याची बाजू खरी असेल, सत्य असेल तिकडे रहा. खऱ्या व सत्याच्या बाजूने युद्ध करा. जेणेकरून सत्याचे व खरेपणाचे रक्षण व्हावे. तुमचे हे कर्तव्य होय की तुम्ही सदैव सत्य व न्यायाचे रक्षण करावे. त्याचे सदैव समर्थन करा. तुमचे

युद्ध केवळ शांति-स्थापनेसाठीच असले पाहिजे. एखाद्या अन्य उद्देशाच्या पूर्ततेसाठी नव्हे. न्यायाचा अवलंब करा. निस्संदेह अल्लाह न्याय करणाऱ्यावर प्रेम करतो. कुणाचीही टिंगल करू नका व कोणालाही बदनाम करू नका. ईश-विश्वासानंतर, अल्लाहवर ईमान आणल्यावर पापकृत्ये, दुराचार, अनैतिक आचार-विचाराचे नाव सुद्धा वाईट आहे. यापासून अलिप्त न राहणे वास्तविक जूलूमआहे. कुणाचा अपमान, करणे, वाईट नावे ठेवणे, दोषारोपण करणे, आघात करणे, दुर्वचन करणे वगैरे 'पापाचार' आहे. यापासून दूर राहण्याचा आदेश दिला गेला आहे.

★ अध्याय ८३ च्या वचन १ व ३ मध्ये म्हटले गेले आहे की मोजमापात कमी करणाऱ्याचा परिणाम फार वाईट आहे. या संदर्भात प्रामाणिकपणा दाखविण्यावर विशेष भर दिला गेला आहे. अध्याय ५५ च्या वचन ९ मध्ये सांगितले आहे की न्यायपूर्ण रीतीने बरोबर वजन करा. वजनात कमी देऊ नका.

★ अध्याय १३ च्या वचन ९ व १० आणि अध्याय १०७ च्या वचन २ व ३ मध्ये निर्देश आहे की अनाथावर क्रोध करू नका. त्यांना धक्के देऊ नका. मोतादांना सहाय्य करा. याचकाला झिडकारू नका. अध्याय १०७ च्या वचन ७ मध्ये सांगितले आहे की 'सामान्य वस्तु' दुसऱ्यांना देण्यास नकार देणे चांगले नाही. 'सामान्य वस्तु' पासून तात्पर्य असे आहे की नेहमी उपयोगी पडणाऱ्या लहान व साधारण वस्तु आहेत. एकाच ठिकाणी राहिल्याने सर्वांना त्याची गरज भासते. म्हणून या बाबतीत परस्पर सहकार्याची भावना असणे आवश्यक आहे.

# ३. नैतिक गुण जे पवित्र कुरआन निर्माण करू इच्छितो

★ पवित्र कुरआनच्या अध्याय २ च्या वचन ८३ व २२० मध्ये वर्णन आहे की अनाथ व मोतादांशी चांगला व्यवहार करा. लोकांशी चांगली व प्रिय बोलचाल करा. याच अध्यायची वचन १७७ मध्ये आदेश आहे की अनाथ मोताद, प्रवासी व याचकासाठी आपले धन खर्च करा. अध्याय ६ ची वचन १५२ व अध्याय १७ ची वचन ३४ मध्ये अनाथांच्या संपत्तीचे रक्षण करण्याचा आदेश आहे. अध्याय ३० ची वचन ३८ मध्ये मोताद व प्रवाशांचा व पाहुण्यांचा हक्क अदा करण्याविषयी ताकीद दिली आहे.

★ अध्याय २ चे वचन ८३, अध्याय ६ चे वचन १५१, अध्याय १७ चे वचन २३ व २४, अध्याय २९ चे वचन ८, अध्याय ३१ चे वचन १४ व अध्याय ४६ च्या वचन २५ मध्ये आपल्या आई-वडिलांशी चांगला व्यवहार करण्याचा आदेश आहे.

★ अध्याय ६ च्या वचन १८७, २२४ व २२८ आणि अध्याय ३० च्या वचन २१ मध्ये एका आदर्श दाम्पत्य जीवनावर प्रकाश टाकला गेला आहे. यात पति-पत्नीला शरीर व वस्त्राच्या संबंधाने उपमा दिली गेली आहे. दुसऱ्या शब्दांत, याला अत्यंत जवळचा संबंध म्हणता येईल. आमच्या मते येथे वस्त्र अर्थात कपड्यांचे तात्पर्य तेच आहे जे अध्याय ७४ चे वचन ४ मध्ये प्रयुक्त शब्द 'कपड्यांचे आहे, अर्थात 'आत्मा'. म्हणून पति-पत्नीच्या शरीर वस्त्राच्या संबंधापासून संभवत: पवित्र कुरआनची भावना 'शरीर-आत्मा' च्या संबंधाने आहे. वचन २२३ मध्ये पत्नीला पतीच्या 'शेती' पासून तात्पर्य असे आहे, 'उत्पादनाचे

साधन, जीवन निर्वाहाचे साधन'. येथे संकेत 'संतानोत्पतीकडे असल्याचे दिसते वचन २२८ मध्ये सांगितले आहे की स्त्रियांचे अधिकार तसेच आहेत जसे पुरुषांचे अधिकार त्यांच्यावर आहेत. येथे स्त्री-पुरुष, पति-पत्नीच्या पारस्परिक हक्कांच्या समानतेवर भर दिला गेला आहे. येथे सूत्रवत गोष्ट सांगितली गेली आहे जिच्या विस्तृत व्याख्येची गरज आहे. परंतु या लघु पुस्तिकेत हे शक्य नाही. अध्याय ३० चे वचन २१ मध्ये म्हटले गेले आहे की पति-पत्नी एकमेकासाठी शांतीची साधने आहेत. त्या दोघांत परस्पर प्रेम आवश्यक आहे. ही व्यवस्था अल्लाहकडून केली गेली असल्याचे सांगितले आहे. म्हणून कोणत्याही परिस्थितीत हे संबंध आदरणीय आहेत.

★ अध्याय १ चे वचन २८० मध्ये म्हटले गेले आहे की जर ऋणको अडचणीत असेल तर त्याची आर्थिक दशा सुधारेपर्यंत त्याला कर्जफेड करण्यासाठी सवड दिली जावी, जर त्याला कर्ज माफ केले तर हे तुमच्यासाठी अधिक चांगले आहे. येथे कर्जदाराशी नरमाईचा व्यवहार करण्यावर भर दिला आहे.

★ अध्याय ४ चे वचन १३५ मध्ये म्हटले आहे की न्याय गोष्टींवर दृढतापूर्वक टिकून रहा. अल्लाहसाठी न्यायाची, सत्याची ग्वाही द्या, मग ती साक्ष स्वतः तुमच्या अथवा तुमचे आई-वडील किंवा नातेवाईकांच्या विरुद्ध का असेना, मग कोणी धनवान असो की निर्धन, कारण त्यांच्यापेक्षा अधिक जवळ अल्लाह आहे.

★ अध्याय १३ चे वचन २२ मध्ये सांगितले आहे की वाईट गोष्टींना भलेपणाने दूर करा. दुर्व्यवहाराचा बदला सद्व्यवहाराने द्या. यामुळे इहलोक व परलोक दोन्हींमधील घर सुधारतात. हीच गोष्ट अध्याय २८ च्या वचन ५४ मध्ये सुद्धा सांगितली गेली आहे. अध्याय ४१ च्या वचन ३४ व ३५ मध्ये सांगितले गेले आहे की चांगुलपणा व वाईटपणा समान होऊच शकत नाहीत. तुम्ही वाईट

गोष्टीला उत्तम गोष्टीने अर्थात चांगुलपणाने टाळा. वाईटपणाचे उत्तर त्याच्या बरोबरीच्या वाईटपणाने नव्हे तर त्याच्याच समतुल्य चांगुलपणाने देण्यावर भर दिले गेले आहे. अशी नीती व्यवहारात तेव्हाच येते जेव्हा सहनशीलता व धैर्याचा अवलंब केला जातो, त्याचबरोबर अल्लाहची कृपा सुद्धा अपेक्षित आहे. अशा व्यवहाराने मोठ्यात मोठा वैरी सुद्धा प्रभावित होऊन प्रेमळ मित्र बनेल, असा पवित्र कुरआनचा दावा आहे, आश्वासन आहे.

स्पष्ट आहे की वाईटपणाच्या अनेक श्रेणी असतात आणि अनेक स्तर सुद्धा. ज्या श्रेणी व स्तराचा वाईटपणा असेल त्याच श्रेणी व स्तराच्या चांगुलपणाने तो दूर केला जाऊ शकतो.

★ अध्याय १४ च्या वचन ७ मध्ये अल्लाहचा निर्देश आहे की जर जगात तुम्ही कृतज्ञता दाखविली तर मी तुम्हाला (आपली दया, आपला अनुदान) देईन आणि जर अकृतज्ञता व्यक्त केली तर कठोर यातना देईन.

येथे ईश्वराने केलेल्या उपकारासाठी कृतज्ञ बनण्याची अर्थात ईश्वराच्या गुणगानाबरोबर त्याने दाखविलेल्या मार्गाचे अनुसरण करण्याची ताकीद दिली आहे. याचा परिणाम असा असल्याचे म्हटले आहे की ईश्वराचा कृतज्ञ बनल्याने जीवनाची गाडी योग्य दिशेत पुढे जाईल व त्याचा चांगला परिणाम होईल ईश्वर सुद्धा प्रसन्न होऊन अधिक कृपा करील, धन-धान्याने संपन्न करील. परंतु जर कृतज्ञतेच्या विरुद्ध कृतघ्नतेचा मार्ग अवलंबिला गेला तर यामुळे जीवनात बिघाड उत्पन्न होईल आणि त्याचा परिणाम म्हणून तुमचे जीवन कष्टमय बनेल. ईश्वराचा कोपसुद्धा तुमच्यावर येईल. अशा स्थितीत यातनेशिवाय काय मिळेल ? हे सांगितल्यानंतर निर्णय मानवावर सोडला आहे की त्याने आपल्यासाठी दोहोंपैकी कोणताही मार्ग निवडावा.

★ अध्याय २४ च्या वचन २२ मध्ये उल्लेख आहे की श्रेष्ठ व सामर्थ्यवान लोकांनी त्या लोकांच्या चुकीबद्दल त्यांना क्षमा करावी आणि त्यांना सोडून द्यावे, माफ करावे. जो असे करील अल्लाह सुद्धा त्याला क्षमा करील. अध्याय ४२ च्या वचन क्र. ३७ व ४३ मध्ये म्हटले गेले आहे की श्रेष्ठ लोक ते आहेत जे राग आला असतादेखील चुका करणाऱ्यांना क्षमा करतात. अपराध्याला क्षमा करणे हे मोठ्या साहसाचे कार्य असल्याचे म्हटले आहे. अल्लाहला ही गोष्ट पसंत आहे. त्याचबरोबर अध्याय ४२ च्या वचन ३९ मध्ये स्पष्ट केले गेले आहे की जर तुमच्यावर एखाद्याने अत्याचार केला, जुलूम केला, अन्याय केला तर त्याला दृढतेने तोंड द्या. येथे असे सांगावयाचे आहे की सहनशीलता व क्षमा करण्याच्या नीतीवर चाला. परंतु अत्याचारी, अनाचारी, अन्यायी व जुलूमी लोकांच्या समोर कदापि गुडघे टेकू नका. त्यांना दृढतेने तोंड द्या. क्षमा व सहनशीलता शक्तिमान लोकांचे अस्त्र आहे भित्र्या लोकांचे नाही. भ्याडपणाचा क्षमा व सहनशीलतेशी कदापि काहीही संबंध नाही, लांब वरचादेखील संबंध नाही.

★ अध्याय ४२ च्या वचन ४० मध्ये सांगितले आहे की जर एखाद्या दुष्कर्माचा बदला घ्यावाच लागला तर दुष्कर्माचा बदला तितकाच वाईट दुष्कर्म आहे. तरी सुद्धा जो क्षमा करील व सुधारणा करील त्याला त्याचा मोबदला देणे अल्लाहच्या हाती आहे. निस्संदेह जुलूमी लोकांना अल्लाह पसंत करीत नाही.

★ अध्याय ६४ चे वचन १६ मध्ये उल्लेख आहे की अल्लाहवर प्रेम करणे आणि त्याचा कोप, यातनाचे भय बाळगण्याला आपले पावन कर्तव्य समजून त्यात आपली संपूर्ण शक्ती लावा आणि आपल्या आत्म्याचा आवाज ऐका. तो मान्य करा व त्याचे पालन करा. आत्म्याच्या उन्नतीसाठी, आत्मकल्याणासाठी आपले धन व

शक्ती खर्च करा. आपल्या मनाच्या लोभापासून आपला बचाव करा. असलेच लोक जगात यश प्राप्त करतात.

येथे असा संदेश दिला गेला आहे की ईश्वर, अल्लाहची भक्ती करा, स्वकल्याणासाठी आपल्या धन-शक्तीने कार्यरत रहा आणि आपल्या मनाचा लोभ, मोह, तृष्णा, मद, क्रोध, काम वगैरे प्रवृत्तींना दृढतापूर्वक रोखत रहा. यातच सफल जीवनाचे रहस्य लपलेले आहे. अशा प्रकारचे जीवन जगण्यानेच इहलोकात सुख, शांति व परलोकात जन्नत (स्वर्ग) प्राप्त होईल.

★ अध्याय २ चे वचन ३ मध्ये सांगितले आहे की पवित्र कुरआनकडून त्या लोकांना मार्गदर्शन व ज्ञान प्राप्त होते जे नमाज (सलात) कायम करतात. अध्याय ४५ व १५३ मध्ये मानवाला नमाजपासून 'मदत' घेण्याचा आदेश दिला आहे. नमाजचा अर्थ आहे 'एखाद्या गोष्टीकडे सरसावणे'. याचे अन्य अर्थ आहेत, नमन करणे, विनम्रता दाखविणे, प्रार्थना करणे. नमाजचा मूळ उद्देश अल्लाहकडे पुढे वाटचाल करणे आहे. याचा आशय अल्लाह, रब (पालनकर्ता) चे गुण स्वत: मध्ये धारण करणे आहे. नमाज दासाला (भक्ताला) अल्लाहशी जोडते. अल्लाहशी जुडण्याचा, भेटण्याचा अर्थ आहे त्याच्या गुणांना आपल्या जीवनात उतरविणे, व्यवहारात दर्शविणे. बंदा (दास, भक्त) नमाजमध्ये अल्लाहजवळ प्रार्थना करतो की हे माझ्या पालनकर्त्या ! माझ्यात विनम्रता, दया, कृतज्ञता व विनयशीलतेचा संचार कर आणि अंहकार, क्रोध व लोभसारख्या महादुर्गूणांचा नाश कर. नमाजच्या माध्यमाने मनुष्याला ती शक्ती प्राप्त होते की ज्या योगे तो अल्लाहच्या मार्गात, नैतिकतेच्या मार्गावर चालू शकेल.

★ अध्याय ७ चे वचन ७ मध्ये आदमच्या संततीला, मानवाला सांगितले आहे की नमाजच्या, उपासनेच्या प्रत्येक प्रसंगी आपली 'शोभा' धारण करा. खा, प्या परतुं मर्यादेच्या बाहेर जाऊ नका. मर्यादाहीन बनू नका.

वरील वचनात शोभा धारण करण्याचा अर्थ योग्य, स्वच्छ कपडे शरीरावर धारण करणे आहे. इस्लाम धर्म संसाराचा जगाचा त्याग करण्याची शिकवण देत नाही. जीवनाच्या सुख भोगाची सामुग्री ईश्वरभक्तासाठी निषिद्ध नाही तर तेच याचे विशिष्ट हकदार आहेत. या वचनात धर्म परायणतेसाठी वैराग्य निषिद्ध केले गेले आहे. साधारणपणे वैरागी एक तर विवस्त्र राहतो अथवा मळकट फाटके कपडे धारण करतो. अशा प्रकारे आहारातदेखील निकृष्ट वस्तूंचाच प्रयोग करतो. इस्लाम सन्यासी वृत्तींच्या या धारणेपासून मानवाला मज्ञाव करतो आणि सरळ व स्वच्छ जीवन जगण्याचा आदेश देतो. नमाजच्या वेळी शोभा धारण करण्याला विशेष अर्थ असा आहे की खुद्द ईश्वर सुद्धा सुशोभित व स्वच्छ माणसाला पसंत करतो. स्वच्छ व सौंदर्ययुक्त वातवारणातच स्वस्थ व उच्च विचारांचा विकास होतो. म्हणून उच्च गुणाने आत्म्याला विभूषित करण्यासाठी शरीराला स्वच्छ, शोभायुक्त व सुसभ्य बनवून ठेवणे सुद्धा आवश्यक आहे.

उपर्युक्त वचनात प्रयुक्त वाक्यांश 'आपली शोभा धारण करा' चा अर्थ काही विद्वान असा लावतात की उपासनेच्या प्रत्येक वेळी आपले उचित, सभ्य व स्वच्छ वस्त्र आपल्या शरीरावर धारण करा. आमच्या मते मानवाची शोभा केवळ त्याचे सभ्य व स्वच्छ कपडेच आहेत असे नव्हे तर त्याची शोभा त्याच्या शरीराची स्वच्छता, त्याची नैतिकता, त्याची सुमधुर वाणी, व विनम्रता सारखे गुण सुद्धा आहेत. आम्हाला वाटते की इबादत (उपासना) च्या प्रत्येक प्रसंगी सद्गुणांनादेखील आपल्या हृदयात धारण करण्याकडे पवित्र कुरआन संकेत करीत आहे. इबादतच्या प्रत्येक प्रसंगी हे गुण धारण करणे अशासाठी आवश्यक आहे की त्यामुळे ते आमच्या जीवनाचा भाग बनतील. याची सवय होण्याच्या दृष्टीने दररोज पाच वेळा नमाज अदा करण्याचाआदेश दिला गेला आहे.या सवयीमुळे स्वच्छता, सभ्यता व नैतिकता मानवी जीवनाचे अंग बनतील, अशी पवित्र कुरआनला आशा आहे. ईश्वरी गुणाने, अल्लाहच्या

गुणाने, नैतिकता व सदाचरणाने मानव आत्मविकासामध्ये सहाय्य घेऊ शकतो ज्याकडे अध्याय २ च्या ४५ व १५३ व्या वचनात वर संकेत केला गेला आहे.

सद्गुण धारण करण्याच्या दिशेत पुढे सरसावणे-नैतिकतेकडे वाटचाल करणे अल्लाहकडे पुढे जाणे होय. या संदर्भात अध्याय ७ चे वचन २६ देखील अगदी स्पष्ट आहे की ज्यामध्ये सांगितले आहे की अल्लाहने मानवासाठी वस्त्र उतरविले आहेत जेणेकरून त्याने आपल्या गुप्तांगांना आच्छादित करावे. वस्त्र त्याच्या रक्षण व शोभेचे साधन आहे. 'तकवा' (धर्मनिष्ठा, ईशप्रेम, पुण्यशीलता, ईश्वराचे भय) चे वस्त्र सर्वोत्तम वस्त्र आहे हे अल्लाहच्या निशाण्यांपैकी एक आहे. कदाचित लोकांनी यावर विचार करावा, जागे व्हावे.

वस्त्राचा अर्थ ती वस्तु आहे ज्याने एखाद्याला झाकले जाते. वस्त्राने मनुष्याच्या शरीराचे रक्षणदेखील होते. पुण्यशीलता, चांगुलपणाची कृत्ये, अल्लाहची भीती, मधुर-प्रिय वाणी आणि विनम्रतेने मानवाचे रक्षण व शोभा या लोकांत व परलोकात होते. स्पष्ट आहे की सामान्य वस्त्र आमचे रक्षण परलोकात कदापि करू शकणार नाहीत. तकवा (अल्लाहचे भय, धर्मनिष्ठा, ईशप्रेम) लाच अल्लाहने मनुष्यासाठी एक उत्तम वस्त्र असल्याचे सांगितले आहे.

म्हणून या वचनांचा आधिभौतिक अर्थ लावण्याबरोबरच आत्मिक व आध्यात्मिक अर्थ सुद्धा घेतला गेला पाहिजे. हे अधिक तर्क-संगत, बुद्धि-संगत ठरेल. अध्याय ७ चे वचन ३१ मध्ये पवित्र कुरआनचा असा आदेश की 'उपासनेच्या प्रत्येक वेळी आपली शोभा धारण करा' या गोष्टीकडे इशारा करीत आहे की 'उपासनेच्या प्रत्येक वेळी पुण्यशीलता व अल्लाहच्या भीतीची भावना आपल्या हृदयात धारण करा. यामुळेच तुमच्या वाईट गोष्टी झाकल्या जातील.' अशाप्रकारे नैतिकता व पावित्र्यालाच मानवाची शोभा, सुरक्षा व श्रेष्ठत्वाचे साधन असल्याचे दिव्य कुरआनमध्ये सांगितले आहे. त्याचा आग्रह आहे की केवळ

शरीरालाच नव्हे तर मनाला सुद्धा सुशोभित करून, सुधारून, आत्म्याला पवित्र करून, नमाज अदा करण्यासाठी या. सामान्य व स्थूल दृष्टीने शरीराची शोभा जरी भौतिक वस्त्रामुळे आहे तरीदेखील सूक्ष्म दृष्टीने मन व आत्म्याची शोभा व सौंदर्य त्याच्या उदार, पवित्र, विशुद्ध, कोमल व मधुर भावनांमुळेच असते. हे लक्षात ठेवावे की आपल्या जीवनात सभ्य व सुशील बनल्याशिवाय मनात कसल्याही सौंदर्य व माधुर्याचा समावेश होणे शक्य नाही.

★ अध्याय ५ चे वचन १०५ मध्ये म्हटले गेले आहे की, हे ईमानधारकांनो ! तुम्हाला स्वत:ची चिंता असली पाहिजे. जर तुम्ही सरळमार्गावर असाल तर एखाद्याच्या मार्गभ्रष्ट होण्याने तुमचे काहीही बिघडणार नाही.

उक्त तटस्थ व्यवस्थेचा आशय असा आहे की प्रत्येक मनुष्य आपल्याच कर्मासाठी अल्लाहजवळ जबाबदार आहे, दुसऱ्यांच्या कार्यासाठी नव्हे. यात दुसऱ्याबद्दल अपार सहिष्णुता आहे. आजच्या व्यावहारिक जीवनाच्या नैतिकतेची हीच मागणी आहे की आम्ही आपल्यापेक्षा वेगळ्या धर्म, पंथ व विश्वास ठेवणाऱ्याबद्दलदेखील असा दृष्टिकोण ठेवून सहिष्णु बनावे.

★ अध्याय ३ च्या वचन ९२ मध्ये स्पष्ट आदेश आहे की तुम्ही नेकी, प्रामाणिकता आणि पावित्र्याच्या दर्जाला तोपर्यंत पोहचू शकत नाही जोपर्यंत तुम्ही आपल्या त्या वस्तूमधून खर्च करीत नाही ज्या तुम्हाला प्रिय आहेत. या वचनात माणसाला आपल्या प्रिय भौतिक वस्तु अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याचा आदेश तर आहेच, त्याशिवाय यात लपलेली भावना अशी आहे की माणूस, जो आपल्या आत्मभाव व वासनांना, पाशविक भावनांना, कोणत्याही भौतिक वस्तु, जशा संतती, स्वजन, पत्नी-पती, वैभव-सामुग्री,यश, मान-प्रतिष्ठा वगैरेंना अधिक प्रिय मानतो, त्याने त्या लोक व पाशविक भावनांपैकी काही खर्च करावे, त्यांच्यावरील प्रेम

कमी करावे, त्याना हळूहळू त्यागावे, त्यांना अल्लाहच्या मार्गात सोडून द्यावे. इतक्याशा कामाने त्याला पावित्र्य, नेकी व अल्लाहशी प्रामाणिक असण्याचा दर्जा कदापि प्राप्त होऊ शकणार नाही. जो आपल्या वासनाशी, इच्छा व दुर्भावनांना चिकटून राहील, त्यांना प्रेम करीत राहील. त्यांचा गुलाम बनून राहील, त्यांना सोडणार नाही, तो कदापि अल्लाहची बंदगी (उपासना, दासता) करू शकणार नाही. याचा परिणाम म्हणून व्यक्ती नैतिक बनेल व नेकी (पुण्यकर्म) करील. त्याचे जीवन पवित्र होईल व तो अल्लाहशी प्रामाणिक राहील.

★ अध्याय ६ च्या वचन १४ मध्ये उल्लेख आहे की, 'हे मुहम्मद (स.) ! सांगा, मला तर हीच आज्ञा (अल्लाहकडून) झालेली आहे की मी स्वत:ला पूर्णपणे त्याला अर्पण करावे.'

उक्त वचनामध्ये जी आज्ञा प्रेषित मुहम्मद (स.) यांना दिली आहे तीच आज्ञा सर्व लोकांसाठी आहे. अल्लाहबद्दल मनुष्याची हीच भावना त्याला खरोखर 'मुस्लिम' बनविते. अल्लाहसमोर आत्मसमर्पण करण्याचेच दुसरे नाव 'इस्लाम' आहे. मनुष्य जेव्हा आपल्या स्वातंत्र्याचा त्याग करून कर्तेपणाची भावना सोडून, आपले सर्वस्व ईश्वराला, अल्लाहला अर्पण करतो आणि पूर्णपणे ईश्वराचा दास, भक्त, अल्लाहचा बंदा (गुलाम) बनतो, तेव्हा त्याला अरबी भाषेत 'मुस्लिम' म्हणतात. मनुष्याची हीच आत्मसमर्पणाची भावना त्याच्या संपूर्ण नैतिकतेचे मूळ होय. आत्मसमर्पणाची हीच भावना अध्याय ६ च्या वचन १६२ मध्ये व्यक्त केली गेली आहे. 'सांगा, माझी नमाज (प्रार्थना) व माझी कुर्बानी (बलिदान देणे) माझे जगणे व माझे मरणे अल्लाहसाठी आहे जो संपूर्ण जगाचा रब (पालनकर्ता) आहे.

★ अध्याय ६च्या वचन १६१ मध्ये वर्णन आहे की जो कोणी नेकी (पुण्यशीलतेचे चरित्र) घेऊन येईल त्याला त्याच्या दहा पटीने मोबदला दिला जाईल आणि जो कोणी बुराई (दुश्चरित्र) घेऊन

येईल त्याला तितकाच मोबदला दिला जाईल आणि त्याच्यावर जुलुम केला जाणार नाही.

या वचनाची भावना अशी आहे की पुण्यशीलतेचा मोबदला त्याच्या कित्येक पटीने अधिक नेकी (पुण्य) करणाऱ्याला अल्लाह देईल. वाईटपणा (पाप) चा मोबदला म्हणून त्याला तितकीच शिक्षा, यातना मिळेल जितके त्याने पाप केले असेल. त्यापेक्षा अधिक शिक्षा नाही कारण अल्लाह क्रूर नाही. तो दयावान आहे. पवित्र कुरआन हाच सिद्धांत आम्हाला आमच्या जीवनात नैतिकतेच्या क्षेत्रात अवलंबिण्याचा सल्ला देताना दिसतो.

दिव्य कुरआन आपल्या अध्याय ५ च्या वचन २८ मध्ये एक अद्‌भुत धैर्य व क्षमादानाचे उदाहरण प्रस्तुत करतो. यात हजरत आदम (अलै.) यांच्या दोन पुत्रांच्या कथेचा उल्लेख आहे. एक मुलगा दुसऱ्या मुलाची हत्या करण्यास तत्पर आहे. दुसरा मुलगा म्हणतो की, "जर तू मला ठार करण्याकरिता आपला हात पुढे करशील तरी मी तुला ठार करण्यासाठी हात पुढे करणार नाही. मी तर अल्लाहचे भय बाळगतो." याच तारतम्यात पुढील वचन २९ मध्ये म्हटले गेले आहे की "मी तर इच्छितो की माझे पाप व स्वतःचे पाप तूच आपल्या शिरावर घे आणि जहन्नम (नरक) मध्ये प्रवेश कर." म्हणून दुसरा मुलगा पहिल्या मुलाला की जो ठार करण्यास तत्पर होता, मारीत नाही, क्षमादान करतो. त्याच्या क्षमादानाने अल्लाह प्रसन्न होतो आणि मारणाऱ्या मुलाला शिक्षा व यातना देतो. त्याच्या क्षमादानाचा नेक बदला अल्लाहने त्याला दिला.

क्षमादान एक उत्तमकोटीची नैतिकता आहे. हत्या करणाऱ्याला सुद्धा जो क्षमादान करील तो एक अद्‌भुत साहसी आहे. त्याची सहनशीलता प्रशंसनीय आहे. या कथेच्या माध्यमाने पवित्र कुरआन आम्हाला असा धडा देऊ इच्छितो की प्राणघातक हल्ल्यासाठी सुद्धा क्षमा करण्याचा प्रयत्न करा, जेणेकरून तुम्ही नैतिकतेच्या शिखरावर चढू शकण्याची शक्ती प्राप्त करू शकाल.

★ अध्याय ५ च्या वचन ४५मध्ये स्वत:वर दुसऱ्या एखाद्याने केलेल्या आघाताबद्दल क्षमा करणे व त्याचा बदला न घेणे सुद्धा एक उत्तम प्रायश्चित्त असल्याचे म्हटले आहे. अशा प्रकारच्या क्षमादानाने वैरी, प्रभावित होऊन आपल्या हृदयात परिवर्तन करील, स्वत:मध्ये सुधारणा करील, शत्रुत्वाचे नाव घेणार नाही आणि मित्र बनेल अशी आशा पवित्र कुरआन करीत आहे.

★ मनुष्याकडून काही अनैतिक कर्म, पाप, कर्म, गुन्हा घडणे शक्य आहे, स्वाभाविक आहे. पवित्र कुरआन या तथ्याचा स्वीकार करून अध्याय ५ च्या वचन ३९मध्ये अशी व्यवस्था देतो की जर एखाद्या मनुष्याकडून एखादे अनैतिक कर्म कोणत्याही कारणाने घडले तर त्यासाठी त्याने प्रायश्चित्त केले व पुन्हा तसे न करण्याची प्रतिज्ञा केली आणि स्वत:ची भविष्यात सुधारणा केली. तसले अनैतिक कर्म केले नाही, त्यापासून अलिप्त राहिला तर निश्चितच अल्लाह त्याच्यावर कृपा करील. कारण तो मोठा क्षमाशील व दयावान आहे.

म्हणून कोणत्याही कारणामुळे नैतिकता सोडून दिल्यानंतर ती पुन्हा ग्रहण करण्यासाठी प्रायश्चित्त करणे एक उत्तम उपाय आहे. पश्चाताप केल्याने माणसात सुधारणा होण्याची अपेक्षा असते. केवळ तोंडी पश्चाताप करणे निरर्थक आहे.

★ निर्भीकता नैतिकता-पालनाचा एक सबळ आधार आहे. निर्भय बनल्याशिवाय कोणीही नैतिक बनू शकत नाही. नैतिक बनण्यासाठी जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात निर्भीकता आवश्यक आहे. हे तथ्य लक्षात ठेऊन पवित्र कुरआनने आपल्या अध्याय ५ च्या वचन ४४ मध्ये अशी व्यवस्था दिली आहे की ''तुम्ही लोकांना भिऊ नका, माझे (अल्लाहचे) भय बाळगा.'' धर्म निष्ठेसाठी असा आदेश दिला आहे की ''माझ्या अध्याय (माझ्या शिकवणी) थोड्या मूल्यावर विकू नका.''

या अध्यायात पवित्र कुरआन प्रत्यक्षपणे म्हणतो की लोकांची भीति बाळगू नका. बाळगावयाची असेल तर केवळ अल्लाहची भीति बाळगा. निर्भय बनन जीवन जगा. लोक आणि त्यांचे संबंध, त्यांच्या परंपरा, त्यांच्या रीति-रिवाजांचे भय बाळगण्याची अजिबात गरज नाही. मात्र अल्लाहचा कोप व यातनांचे भय बाळगा. निर्भय बनून न्यायपूर्वक योग्य कर्म करा. भयभीत होऊन कोणतेही कार्य करू नका. मग ती भीति कुणाची का असेना. आपल्या आत्म्याचा आवाज, अल्लाहचा आवाज व संकेत समजून त्यानुसारच काम करा. कुणी तरी किती चांगले म्हटले आहे -

"जब प्यार किया तो डरना क्या?"

अर्थात - प्रेम केल्यावर भीति बाळगण्याचे काय कारण ?

प्यार, प्रेम कोणाशी केले ? अल्लाहशी. तर मग भीति कसली ? अल्लाहवर प्रेम करणाऱ्यासाठी 'भय' निरर्थक गोष्ट आहे. तो कोठेही, केव्हाही अल्लाहशिवाय कोणालाही भीत नाही. म्हणूनच तो नैतिकतेच्या मार्गावर चालण्यास समर्थ बनतो. म्हणूनच सत्य त्याच्या बरोबर असते. पवित्र कुरआन जोर देऊन सांगतो की अल्लाहच्या आदेशांना, त्याच्या शिकवणींना, आदर्शांना त्याच्याद्वारे प्रचारित ज्ञानाला, लहानशा ऐहिक लाभासाठी, तात्कालिक लाभासाठी, कुणाकडून भयभीत होऊन, कुणाच्या दबावाखाली, त्यागू नका, सोडू नका, विसरू नका, हानि सहन करून सुद्धा सदैव धर्माला कवटाळून रहा. निर्भय बनून कोणत्याही स्थितीत धर्माचे आचरण करण्याचा सल्ला या अध्यायात दिला गेला आहे. लक्षात ठेवा. उच्चकोटीची प्रकाशमान नैतिकताच धर्म-धारणा आहे.

★ अध्याय २ च्या वचन १०९मध्ये वर्णन आहे की तुम्ही क्षमाशील बना आणि (ज्याने तुमचा काही अपराध केला आहे त्याला) जाऊ द्या, सोडून द्या. अध्याय ११० मध्ये सांगितले आहे की नमाज कायम करा - नमाज पढत रहा आणि जकात (१००

रुपयांवर अडीच रुपये दान) देत रहा. अध्याय ११२ मध्ये उल्लेख आहे की निस्संदेह जो कोणी (मग पूर्वी तो कोणत्याही धर्माचा अवलंब करीत असो) स्वतः अल्लाहसमोर नतमस्तक होईल आणि उत्तम कर्म करीत राहील त्याच्यासाठी त्याच्या 'रब' (पालनकर्ता) जवळ त्याचा मोबदला आहे. अशा लोकांना कसलेही भय असणार नाही व ते दुःखी देखील होणार नाहीत. या अध्यायातील भावना संत कबीर अशा प्रकारे स्पष्ट करताना दिसतात --

''जाति-पाँति पूछे ना कोई, हरि को भजै सो हरि का होई''

अर्थात-प्रभु-भक्तीमध्ये कुणीही जातपातीची चौकशी करीत नाही. तेथे तर तोच ईश्वराचा प्रिय बनतो जो त्याची उपासना करतो.

या अध्यायात या तथ्यावर भर दिला गेला आहे की धर्म-धारणेसाठी हे आवश्यक आहे की मनुष्याने स्वतः अल्लाहसमोर नतमस्तक व्हावे आणि उत्तम रीतीने कर्म करावे. ईश-विश्वास व उत्तम कर्मच मानव-धर्म आहे. उत्तम रीतीने पुण्य-कर्म करणेच नैतिकता आहे. जर याच्या बरोबर ईश्वर-प्रेम मिसळले तर तो धर्म बनतो. नमाजच्या बाबतीत सांगितले गेले आहे की तिला सदैव सुरू ठेवा आणि जकातच्या बाबतीत आदेश आहे की ही सदैव देत रहा. नमाज सोडू नका आणि जकात रोखून ठेवू नका. एखाद्या वेळी नमाज अदा करून व एखाद्या वेळी जकात देऊन त्याची इतिश्री झाली असे समजू नका. हे आयुष्यभर करीत रहा, देत रहा. मनुष्याची हीच भावना त्या 'साधी राहणी व उच्च विचारसरणी'ला जन्म देते.

★ अध्याय २ च्या वचन क्र. ११५ मध्ये स्पष्ट म्हटले गेले आहे की, ''पूर्व व पश्चिम (दक्षिण-उत्तर, खाली-वर सुद्धा) अल्लाहच्याच आहेत; तर तुम्ही जिकडे (उपासनेच्या वेळी) आपले तोंड कराल, तिकडेच अल्लाहचे तोंड आहे. निस्संदेह, अल्लाह (तुमच्या भावना व कर्मांना) जाणणारा आहे. तशीच भावना अध्याय

१४२ मध्ये सुद्धा व्यक्त केली गेली आहे.

उक्त अध्यायामध्ये अशी भावना आहे की अल्लाहची उपासना (इबादत) 'भावप्रधान' व 'कर्मप्रधान' असते. कर्मकांडाच्या आडंबराशी त्याचे काही घेणे देणे नाही. ही विशुद्ध नैतिकता आहे जी व्यवहारात आणली जाते. हीच अल्लाहची खरी इबादत (उपासना) आहे.

★ अध्याय २ च्या वचन १३८मध्ये पवित्र कुरआन मनुष्यांना अल्लाहच्या रंगात स्वत:ला रंगविण्याचा आग्रह करतो कारण तोच सर्वोत्तम रंग आहे.

स्पष्ट आहे की, 'अल्लाहचा रंग' त्याचे गुण, वैशिष्ट्ये होत. त्यांचा अवलंब करणे, त्यांना जीवनात उतरविणे, कर्म व व्यवहारात आणणेच स्वत:ला त्यात रंगविणे होय. अल्लाहचे गुण धारण केल्याने मनुष्य नैतिक बनतो.

★ अध्याय २च्या वचन १४८मध्ये म्हटले गेले आहे की प्रत्येक माणसाचे एक निर्धारित लक्ष्य आहे तो त्याकडेच पुढे सरसावतो. तुम्ही नेकी (पुण्य)कडे अग्रसेर व्हा.

या वचनात माणसांना 'नेकी' (पुण्य)ला आपले लक्ष्य बनविण्याचा आग्रह केला गेला आहे. एखाद्याशी स्वेच्छापूर्वक, नि:स्वार्थ भावनेने, सद्व्यहार करणे नैतिकतेची गरज आहे.

★ अध्याय २च्या वचन२१ मध्ये सांगितले आहे की जगातील सर्व लोक एकाच समुदायाचे आहेत. यांच्यातील विभेद व मतभेद अल्लाहला पसंत नाहीत.

हाच पवित्र कुरआनचा संदेश 'वसुधैव कुटुंबकम' आहे जो उच्च दर्जाची नैतिकता व उदार चेतनेवर आधारित आहे.

अध्याय २ च्या वचन २१९ मध्ये म्हटले गेले आहे की लोक तुम्हाला (प्रेषित मुहम्मद (स.) यांना) विचारतात की "किती खर्च करावे?" सांगा, जितका तुमच्या (लोकांच्या) गरजेपेक्षा

अधिक आहे. अल्लाह तुमच्यासाठी आपली वचने अशाप्रकारे यासाठी स्पष्ट करतो की तुम्ही लोकांनी सर्व गोष्टी विचारपूर्वक कराव्यात.

खर्चाचा वरील सिद्धांत विशुद्ध रूपाने 'अपरिग्रहाच्या भावनेवर आधारित आहे जी धर्म व नैतिकतेचे एक लक्षण आहे. यामुळे संपत्तीच्या अयोग्य संग्रहावर प्रभावी नियंत्रण येते. समाजात दानाचा संचार योग्य रितीने होत राहतो. खुद्द शोषण करण्याच्या प्रवृत्तीचा उत्साह नाहीसा होतो. धनाचा अपसंचय देखील होत नाही. ही गोष्ट समाजाला हितकारक आहे.

★ अध्याय २ च्या वचन २१५ मध्ये संपत्तीच्या खर्चाच्या पद्धती स्पष्ट केल्या आहेत. असे म्हटले गेले आहे की आपल्या सामान्य गरजांची पूर्तता करण्यासाठी व आई-वडील, नातेवाईक, अनाथ, मोताद, प्रवासी, अतिथी आणि गरीब वगैरेंवर खर्च करा.

संपत्तीच्या उपयोगाच्या संदर्भात हीच नैतिकतेची मागणी सुद्धा आहे. आपल्या कल्याणाबरोबरच समाजाचे सुद्धा कल्याण ज्या संपत्तीने होईल तोच संपत्तीचा नैतिक उपभोग आहे. उक्त वचनात याच गोष्टीकडे पवित्र कुरआनने संकेत केला आहे.

★ अध्याय २ च्या वचन २२० मध्ये उल्लेख आहे की लोक तुम्हाला (प्रेषित मुहम्मद (स.) यांना) अनाथांच्या बाबतीत विचारतात. सांगा, ज्यात ज्यांचे (अनाथांचे) हित असेल तेच उत्तम आहे. जर तुम्ही त्यांना आपल्याबरोबर घ्याल, तर ते तुमचे 'बंधूच' आहेत.

अनाथांच्या बाबतीत उक्त प्रकारचा व्यवहार नैतिकतेची कसोटी आहे. अनाथांना आपल्या समवेत घेण्यासाठी 'सद्भावना' असणे आवश्यक आहे कारण ते बंधु समान आहेत आणि त्यांचे व त्यांच्या हितांचे रक्षण करावयाचे आहे.

★ अध्याय २ च्या वचन २५६ मध्ये उल्लेख आहे की 'दीन'

(धर्म)च्या बाबतीत कसलीही जोर-जबरदस्ती नाही. सत्य गोष्ट असत्य गोष्टीपासून एकदम वेगळी होऊन समोर आली आहे. अध्याय २५७ मध्ये वर्णन आहे की अल्लाह त्या लोकांचा संरक्षक आहे, मित्र आहे. जे ईमान (विश्वास) वर दृढ असतात. तो त्यांना अंधारातून काढून प्रकाशाकडे आणतो.

दीन (जीवनपद्धती) च्या संबंधाने उपरोक्त नीतीचा अवलंब करणेच योग्य आहे. आज जेव्हा जगात धर्माच्या नावाने महायुद्ध, विनाशकारी भांडणे, पृथकतेची भावना जोमाने वाढत आहे आणि धर्माच्या नावावर एक मानव दुसऱ्या मानवावर तलवार उचलीत आहे. धर्माचा प्रचार बंदुकीच्या धाकाने होत आहे. तेव्हा उक्त अध्यायामधील भावना या सर्व समस्यांची सोडवणूक प्रस्तुत करीत आहे. आज एका देशात, एका राष्ट्रात बहुरंगी, बहुव्यवसायी व बहुधर्मी समाज राहत आहेत, जर रंग, धंदा व धर्माच्या नावाने त्यांच्यात भांडणे होत राहिली. जोर-जबरदस्ती होत राहिली तर त्या देशाचे तुकडे-तुकडे होतील व राष्ट्र विस्कळीत होऊन विनाशाप्रत जाईल. तर मानवाच्या या कृत्यावर मानवता एखाद्या कोपऱ्यात आक्रोश करीत असल्याचे दिसेल.गीता, कुरआन व बायबलसारख्या पवित्र ग्रंथांची दररोज होळी होत राहील आणि त्यांचे पावन उपदेश, त्यांच्या सर्व शिकवणी व्यर्थच नव्हे तर अनर्थ माजविणाऱ्या सिद्ध होतील. या सर्व समस्यांचे समाधान उक्त अध्याय अत्यंत थोडक्या शब्दात असे व्यक्त करतो की "दीन (जीवनपद्धतीत) च्या बाबतीत कसलीही जोर जबरदस्ती नाही." या समस्येची सोडवणूक यात नाही की तलवारीच्या धाकाने एखाद्याचे धर्मपरिवर्तन केले जावे. यामुळे तर परस्पर घृणा, द्वेष, तणाव व युद्धे अधिक वाढतील. समस्येची सोडवणूक होण्याऐवजी आणखी अधिक गुंतागुंत वाढेल. यांची एकमात्र सोडवणूक यात आहे की कोणतीही धारणा जबरदस्तीने एखाद्यावर लादली जाऊ नये आणि त्याला एखादा विशिष्ट धर्म स्वीकारण्यास भाग पाडू नये. मनुष्य लोक-परलोकातील आपल्या कल्याणाचा विचार करून

स्वेच्छेने ज्या धर्माचा स्वीकार करील त्यानुसार चालण्याचे पूर्ण स्वातंत्र्य दिले जावे. उक्त अध्यायातील शांतिप्रिय भावनेचे धर्माच्या बाबतीत अवलंबन केले जावे. तेव्हाच देशाचे ऐक्य व समृद्धि स्थिर राहू शकेल आणि मानवाचा नैतिक, धार्मिक, आध्यात्मिक, सामाजिक, आर्थिक व राजनैतिक विकास होऊ शकेल.

सत्याच्या (धर्माच्या) स्वभावाच्या बाबतीत दिव्य कुरआनची मान्यता आहे की हे स्वतः प्रकट होते. सत्य स्वतः प्रकाशमान होते. ते असत्यापासून (अधर्म-विधर्मापासून) स्वतः पृथक होते. याच्या प्रकटीकरणासाठी कोणत्याही प्रकारच्या प्रयासाची, प्रयत्नाची गरज नसते. अल्लाह स्वतः सत्याचा (धर्माचा) संरक्षक आहे. आज पवित्र कुरआनच्या या शिकवणीवर आम्ही सखोल विचार करून ती हृदयंगम करण्याची गरज आहे. मनुष्याच्या नैतिकतेची गरज अशी आहे की त्याने या स्वयंप्रकाशित सत्याकडे (धर्माकडे) पहावे आणि त्याने स्वतः स्वेच्छेने, स्वतंत्रतापूर्वक ते प्राप्त करावे.

★ अध्याय ९ च्या वचन ११९व अध्याय ३३ च्या वचन ८ मध्ये ईमान आणणाऱ्यांना म्हटले आहे की अल्लाह विषयक आपल्या कर्तव्यांच्या बाबतीत सचेत, सावध रहा आणि सत्य लोकांच्या बरोबर रहा.

यांच्या अनुसरणाने आम्हाला सत्य-मार्गावर चालण्याची प्रेरणा मिळते जी सर्व नैतिक कर्माची मूळ आहे. सत्याला जर 'नैतिक ईश्वर' म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. याच वचनात पुढे सत्यार्थ, खरेपणाचे शुभफळ देण्याचे आश्वासन सुद्धा अल्लाहने दिले आहे. जो आम्हाला या दिशेत पुढे वाटचाल करण्यास प्रोत्साहित करतो.

★ अध्याय १७च्या वचन ३४ व अध्याय २ च्या वचन १७७ मध्ये आदेश आहे की आपले वचन पूर्ण करा. अनाथांच्या संबंधाने तुम्ही जी प्रतिज्ञा केली आहे ती उत्तम रीतीने, सद्भावनापूर्वक पूर्ण करा. निश्चितच याचा चांगला मोबदला अल्लाह तुम्हाला देईल.

या वचनात वचन, प्रतिज्ञा पूर्ण करण्यावर भर दिला गेला आहे व अनाथांशी सद्‌भावनापूर्वक उत्तम रितीने व्यवहार करण्यावर भर दिला आहे. नैतिक दृष्टीने हे उत्तम चरित्र आहे.

★ अध्याय २८ च्या वचन ७६ मध्ये म्हटले आहे की जे काही अल्लाहने कृपा करून तुम्हाला दिले आहे त्यावर तुम्ही जगात फुगून जाऊ नका. त्यावर गर्व करू नका. त्याच्या आधारावर अत्याचार करू नका. अध्याय ७७ मध्ये आदेश आहे की, जे काही अल्लाहने तुला दिले आहे त्याच्याद्वारे 'अखिरत (परलोक) चे घर' बनविण्याचे,सजविण्याचे उपाय कर आणि त्यातील आपल्या भागाची उपेक्षा करू नकोस. तू दुसऱ्यापर उपकार कर ज्याप्रकारे अल्लाहने तुझ्यावर उपकार केले आहेत. जगात बिघाड व उपद्रवाचा इच्छुक बनू नकोस कारण अल्लाहला हे आवडत नाही.

उक्त वचनात अल्लाहच्या देणग्या प्राप्त करून गर्व न करण्याचा योग्य सल्ला दिला गेला आहे. त्यांच्या माध्यमाने दुसऱ्यावर उपकार करणे व दुसऱ्यासाठी सत्कार्य करण्याबद्दल सांगितले आहे. जगात शांतिपूर्वक जीवन जगण्याचा सल्ला सुद्धा दिला आहे. भांडण-तंटे, उपद्रव व दुष्प्रचार न करण्याचा आदेश दिला गेला आहे. त्यांच्या आधारे कोणत्याही प्रकारचा अत्याचार, दुराचार न करण्याचा परामर्श दिला गेला आहे. हीच तर आमची नैतिकता आहे.

एक गोष्ट उक्त अध्याय ७७ मध्ये विशेषतः लक्षात ठेवण्याजोगी आहे. ती अशी की अल्लाहने जे काही आम्हाला दिले आहे. त्याच्या संबंधाने दोन आदेश दिले गेले आहेत. आदेश असा की त्यातून आपल्या भागाचा सुद्धा अल्लाहचे उपकार मानून उपभोग घ्या, त्याची उपेक्षा करू नका. आदेशाचा हा क्रम निरर्थक नाही. हा क्रम उलटल्यास वचनाच्या मूळ भावनेला आघात पोहचू शकतो. आदेशांच्या क्रमाचा उद्देश असा दिसतो की सर्वप्रथम त्याच्याद्वारे 'अखिरतचे घर' बनविणे व

सजविण्याचा उपाय करा. दुसरा असा की जर काही शिल्लक राहिले तर त्याला आपला भाग समजून कृतज्ञतेने त्याचा उपभोग घ्या. जर आम्ही हा क्रम उलटला आणि सर्वप्रथम आपल्या भागाचा उपभोग करू लागलो तर कदाचित त्यातून 'अखिरतचे घर' बनविण्यासाठी पाठीमागे काहीही उरणार नाही, कारण आमच्या गरजा अनंत व असीम आहेत. त्यांची पूर्तता करणे आम्हाला शक्य नाही. अल्लाहने दिलेल्या सर्व देणग्या जर त्यांचीच पूर्तता करू शकणार नाहीत तर आखिरतचे घर कसे बनेल व सजविले जाईल ? म्हणून 'अखिरतचे घर' सर्वप्रथम निर्माण करण्याचा आदेश आहे व त्यानंतर या जगातील घर बनविण्याची परवानगी दिली गेली आहे.

उक्त वचने याच भावनेने अल्लाहने दिलेल्या देणग्यांच्या सीमेत जीवन व्यतीत करण्याचा परामर्श देत असल्याचे दिसते. आमची नैतिकता देखील काही अशाच प्रकारचे जीवन जगण्यास सांगते.

★ अध्याय २४ च्या वचन २२ मध्ये सांगितले आहे की तुमच्यापैकी जे श्रेष्ठ व सामर्थ्यवान आहेत, सक्षम आहेत. त्यांच्यासाठी हे आवश्यक आहे की त्यांनी आपल्या गरीब नातेवाईकांना, मोतादांना, अनाथांना, गरीबांना व अल्लाह आणि धर्माचे कार्य करणाऱ्यांना सर्व प्रकारे सहाय्य करीत राहिले पाहिजे. मग त्यांनी तुमच्याशी काही दुर्व्यवहार का केलेला असेना, तुम्हाला काही नुकसान का पोचविले असेना, तुमच्यावर अथवा तुमच्या जवळच्या नातेवाईकांवर काही आरोप, खोटा कलंक, का लावलेला असेना. तरी सुद्धा त्यांना क्षमा करा आणि सोडून द्या, त्याबद्दल त्यांना शिक्षा करू नका. त्यांच्यासाठी देखील आपले सहाय्य चालूच ठेवा. त्यांना सर्व प्रकारे मदत करा. या वचनात अशा लोकांचे लक्ष अल्लाहच्या 'क्षमाशील व दयावान' असण्याच्या गुणाकडे आकर्षित केले आहे आणि त्यांना म्हटले गेले आहे की काय तुम्हाला असे वाटत नाही की अल्लाहने तुमच्या

चुकीची क्षमा करावी ? म्हणून, तुम्ही देखील चुका करणाऱ्याला क्षमा करा आणि त्यांच्यावर दया करून त्यांना मदत करीत रहा. त्यांना मदत करताना आपले हात आखुड करू नका. जर तुम्ही असे केले तर अल्लाह सुद्धा तुमच्या त्रुटीसाठी तुम्हाला क्षमा करील आणि तुम्हाला मदत करणे सुरु ठेवील.

या वचनात लोकांनी क्षमाशील व दयावान बनून रहावे असा आग्रह पवित्र कुरआनने केला आहे, हीच भावना मानवात उच्चकोटीच्या नैतिकतेला जन्म देते.

★ अध्याय ३च्या वचन १५९ मध्ये म्हटले आहे की हे पैगंबर (स.)! हा अल्लाहचा दयाळूपणा आहे की तुम्ही जगवासियांसाठी फारच मृदुल स्वभावाचे आहात. जर तुम्ही क्रूर स्वभावाचे व कठोर हृदयाचे असता तर लोक तुमच्यापासून, तुमच्या संगतीतून दूर झाले असते. गळले असते. तुम्ही त्यांना त्यांच्या त्रुटीसाठी क्षमा करा आणि अल्लाहजवळ देखील त्यांच्या त्रुटीबद्दल क्षमा करण्याची दुआ (प्रार्थना) मागा.

या वचनात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या स्वभावाच्या संबंधाने जे काही म्हटले गेले आहे आणि त्याचे काही परिणाम सांगितले गेले आहेत आणि त्याच्या अनुकूल त्यांना आदेश अल्लाहने दिला आहे. तोच आदेश संपूर्ण जगाच्या लोकांवर यथावत लागू असल्याचे समजले पाहिजे. यातच सर्वांचे कल्याण आहे. नरम स्वभाव, मृदु व्यवहार सर्वांसाठी हितकारी असतो - आपल्या स्वत:साठी व दुसऱ्यासाठीही. अशा स्वभावाचा मनुष्य सर्वांना सहजपणे आपला बनवितो व सर्वांकडून आदर प्राप्त करतो. यामुळेच तो नैतिकही बनतो. जीवनाची ही नीति श्रेष्ठ आहे.

★ अध्याय २५ च्या वचन ६३मध्ये म्हटले गेले आहे की रहमान (कृपाळू) चे खरे दास तेच लोक आहेत जे जगात नम्रतापूर्वक चालतात. जेव्हा एखादा अज्ञानी मनुष्य त्यांच्याशी काही

अज्ञानतापूर्ण गोष्टी करतो, त्यांना काही बरे-वाईट म्हणतो. कठोर गोष्टी ऐकवितो तेव्हा ते त्याच्या उत्तरादाखल त्याला 'सलाम' करून त्याच्यापासून वेगळे होतात. अशा लोकांना दुर्जन, अज्ञानी, दुष्ट लोकांशी वितंडवाद करणे आवडत नसते.

काही अशाच प्रकारची भावना अध्याय २८च्या वचन ५५ आणि अध्याय २३ च्या वचन ३ मध्ये प्रदर्शित केली गेली आहे.

उपरोक्त सर्व वचनांत लोकांना या जगात नम्रतापूर्वक राहणे व दुर्जनांच्या अज्ञानतापूर्ण गोष्टीत न गुंतण्याचा उपदेश दिला गेला आहे. जीवनाची ही एक उत्कृष्ट नीति आहे.

★ अध्याय २५ च्या वचन ७२ मध्ये वर्णन आहे की अल्लाहचे खरे दास ते आहेत जे मिथ्या, खोटे, असत्य व दुष्कृत्याचे साक्षी बनत नाहीत. जेव्हा कधी त्यांच्यासमोर असे प्रसंग उपस्थित होतात तेव्हा ते सज्जन माणसाप्रमाणे निघून जातात.

या वचनात या जगाच्या फसवेगिरी व दुष्कृत्यांच्या मधून सज्जनतेने निघून जाण्याविषयी सांगितले गेले आहे. त्यात गुंतणे चांगली गोष्ट नाही. हीच नैतिकतेची मागणी आहे.

# ४. नैतिकता व शिष्टाचार

* पवित्र कुरआनच्या अध्याय ४ मधील वचन ८६ मध्ये म्हटले गेले आहे की एका व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीला सलाम (नमस्कार) करावे, त्याला अभिवादन करावे आणि सलामचे उत्तर शिष्टतापूर्वक चांगल्या शब्दांत द्यावे. त्याला सुख शांति मिळण्याचा दुआ (प्रार्थना) द्या. पवित्र कुरआनची ही व्यवस्था परस्पर सद्‌भावना, प्रेम, ऐक्य उत्पन्न करण्याच्या उद्देशाने केली गेली आहे.

* अध्याय २४ च्या वचन २७ मध्ये दुसऱ्यांच्या घरात त्यात राहणाऱ्या लोकांची परवानगी घेऊन प्रवेश करण्याची आज्ञा दिली गेली आहे. हा एक सामाजिक शिष्टाचार आहे.

  अध्याय २८ च्या वचन ८३ मध्ये सांगितले आहे की या जगात आपल्या मान-सन्मान, यश-प्रतिष्ठा, मोठेपणाची इच्छा अभिमानाच्या वशीभूत होऊन करू नका. उद्दामपणा करू नका. या जगात बिघाड, उपद्रव व अशांति उत्पन्न करू नका. असले कोणतेही कृत्य करू नका जे तुम्हाला त्याकडे नेत असेल.

या व्यवस्थेचा मूळ उद्देश असा आहे की या जगात विनम्र, शांतिप्रिय, धार्मिक व लोकहिताचे इच्छुक बनून जीवन व्यतीत करा. हीच नैतिकतेची गरज आहे.

* अध्याय २ च्या वचन २७५ मध्ये सांगितले आहे की अल्लाहने व्यापाराला हलाल (वैध) व व्याजाला हराम (अवैध) ठरविले आहे.

निस्संदेह व्याज घेणे अनैतिक आहे. व्याज समाजाच्या पतन व विनाशाचे सुद्धा कारण बनते. व्याज घेल्याने समाजात द्वेष, ईर्ष्या व निर्दयतेच्या भावनेची लोकात वाढ होते आणि प्रेम, सहानुभूति व

त्यागाच्या भावनेचा ऱ्हास होतो. व्याज घेणारा समाज नैतिकदृष्ट्या उन्नति करू शकत नाही. ही एक 'अनुत्पादित प्राप्ती' आहे जी आपल्याबरोबर अनेक वाईट गोष्टी आणते. संपत्तीचा संचय प्रतिकूल रीतीने प्रभावित होऊ नये म्हणून व्याजाचा दुसरा विकल्प जो नैतिक ही असावा आणि उत्पादक सुद्धा शोधला जाण्याची गरज आहे. व्यापाराची वैधता व स्वतंत्रता देखील याचा एक सुंदर विकल्प होऊ शकतो. वर्तमान काळात सरकार व बँकांकडून दिले जाणारे व्याज सुद्धा अनैतिक असल्याचे म्हटले जाऊ शकते कारण यामुळे समाजाचे शोषण होते.

★ अध्याय ३३ च्या वचन ६ मध्ये म्हटले आहे की त्यांचा (प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या) पत्नी त्यांच्या (मुसलमानांच्या) माता आहेत.

★ अध्याय २४ च्या वचन २, ३ व ४ मध्ये व्यभिचार करणाऱ्या स्त्री-पुरुषांना कठोर शिक्षा देण्याची व्यवस्था आहे, हे एक-अपकृत्य मानले गेले आहे. शीलवान स्त्रीवर मिथ्यारोप करणे वाईट मानले गेले आहे. अध्याय १७ च्या वचन ३२ मध्ये व्यभिचार व बलात्काराजवळ न फिरकण्याचा आदेश आहे. याला एक अश्लील कर्म व वाममार्ग म्हटले आहे. अध्याय २४ च्या वचन २३ मध्ये उल्लेख आहे की जे लोक सत्शील, निर्मळ हृदय आणि दुराचाराच्या गोष्टीपासून अनभिज्ञ अशा निष्पाप स्त्रियांवर (याचप्रमाणे पुरुषावर) मिथ्या आरोप, खोटा कलंक लावतात त्यांचा या जगात व परलोकात सुद्धा धिक्कार आहे आणि त्यांच्यासाठी कठोर यातना आहेत.

पवित्र कुरआनने व्यभिचार, बलात्कार व खोटा कलंक लावण्यास अश्लील व अपकृत्य ठरवून त्याला निंद्य मानले आहे. असले कर्म अनैतिक आहेत व एका सभ्य समाजासाठी अशोभनीय देखील. यामुळे स्त्री-पुरुषाच्या मर्यादेचे उल्लंघन होते जे पवित्र कुरआनला अपेक्षित नाही.

अध्याय १७ च्या वचन ३५ मध्ये आदेश आहे की जेव्हा तुम्ही मापून एखादी वस्तु द्याल तेव्हा माप पुरेपूर भरून देत जा आणि जेव्हा वजनाने तोलून द्याल तेव्हा बरोबर तोलून द्या. हेच उत्तम आहे आणि याचा परिणाम देखील चांगला आहे.

वरील व्यवस्थेत मोज-मापाच्या बाबतीत पूर्णपणे प्रामाणिकता दाखविण्यावर भर दिला आहे. नैतिकतेची मागणी आहे की आम्ही व्यापारांसंबंधी क्रिया, मोज-माप व वजन वगैरेशी संबंधित कार्यात नैतिक रुपाने प्रामाणिक रहावे. व्यापारिक नैतिकतेचा एक वेगळा स्तर असतो. त्याचे पालन प्रत्येक स्थितीत आम्हा व्यापाऱ्यांना केले पाहिजे, ही उक्त वचनाची अपेक्षा आहे.

★ अध्याय ३१ च्या वचन १८ व १९ मध्ये आदेश आहे की या धरतीवर ऐटीने दिमाखात चालू नका, आत्मस्तुती करणारे व बढाया मारणारे बनू नका, हे अल्लाहला पसंत नाही. या जगात साध्या चालीने चला आणि गोड, मृदु भाषेत बोला, कठोर आवाज, कर्ण कटु वचन बोलू नका. गाढवाप्रमाणे कर्णकटु आवाज वाईट असतो.

या वचनात मृदु भाषण, गोड बोल बोलण्यास चांगले म्हटले गेले आहे. गोड वचनाने सर्वत्र सुख व शांतिचा संचार होतो. नैतिकतेचा सुद्धा हाच उद्देश आहे.

★ अध्याय २४ च्या वचन ३० व ३१ मध्ये लोकांना हे मार्गदर्शन दिले गेले आहे की त्यांनी आपली दृष्टी खाली ठेवावी व आपल्या लज्जास्थान व गुप्तांगाचे रक्षण करावे. ही त्यांच्यासाठी अधिक चांगली गोष्ट आहे. या संदर्भात स्त्रियांना विशेष रूपाने जागरुक राहण्यास सांगितले आहे. त्यांनी आपला शृंगार व वक्षस्थळाचे अयोग्य प्रदर्शन करू नये.

★ या वचनांचा उद्देश असा आहे की आम्ही मनाने, वाचेने व

कर्माने सर्वप्रकारे संयमित रहावे, डोळे, नाक, कान, जीभ, हात, पाय, मन, बुद्धी वगैरे कोणत्याही इंद्रियाचा प्रयोग व्यभिचार, दुराचार, अत्याचार व असत्याच्या दिशेने करू नका. एका सभ्य व नैतिक समाजाची हीच मागणी आहे.

★ अध्याय ४ च्या वचन ८६ मध्ये म्हटले आहे की जेव्हा तुम्हाला सुखशांतीची एखादी दुआ (आशीर्वाद, प्रार्थना) दिली जाईल तेव्हा तुम्हीदेखील सुख शांतीची त्याच्यापेक्षा अधिक चांगली दुआ द्या किंवा त्याचीच पुनरावृत्ती करा.

★ अध्याय २४ च्या वचन २८ मध्ये म्हटले आहे की दुसऱ्यांच्या घरात प्रवेश करण्यापूर्वी त्यात राहणाऱ्यांना सलाम करा. जर त्यात कोणी नसेल तर त्यात प्रवेश करू नका. जर तुम्हाला सांगितले गेले की परत जा तर तुम्ही परत जात जा. ही तुमच्यावर शुद्धतेची गोष्ट आहे.

प्रत्येक नैतिक समाजाच्या सभ्य, सुसंस्कृत, व्यक्तीचा असा सामान्य व्यवहार असला पाहिजे. त्याचे कोणत्याही स्थितीत पालन केले गेले पाहिजे.

★ कर्ज अदा करणे अनिवार्य आहे. कर्जातून मुक्त होणेच या इहलोक व परलोक दोन्हीमध्ये कल्याणकारी असते. कर्ज अदा करण्यात उपेक्षा करणे एक प्रकारे विश्वासघात आहे जो पवित्र कुरआनला पसंत नाही. कर्जफेडीचा इन्कार करणे म्हणजे नैतिकतेच्या मापदंडावर निम्नतम कोटीचे आचरण आहे. मुक्ती प्राप्त होण्यासाठी व जन्नत (स्वर्ग) मिळण्यासाठी कर्जाची फेड आवश्यक असल्याचे पवित्र कुरआनने म्हटले आहे - कर्जफेडीचा प्रकार कोणताही असू शकेल, जसे कर्ज देणाऱ्याने कर्ज माफ करणे, पैशाऐवजी त्या मूल्याचे श्रम करणे, कर्जाची एखाद्या अन्य प्रकारे फेड कर्ज देणाऱ्याच्या सम्मतीने करणे वगैरे. लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट अशी की वारशात आलेल्या पैतृक ऋणाचा

देखील यात समावेश आहे. याची सुद्धा फेड करणे आवश्यक आहे.

★ अध्याय ४९ च्या वचन १० मध्ये म्हटले आहे की जे आपसात भांडत आहेत, अशा दोन माणसांचे भांडण सामोपचाराने मिटवा. या बाबतीत अल्लाहचे भय बाळगा जेणेकरून तुम्हावर दया केली जाईल.

या वचनाचा उद्देश असा आहे की समांजात आपापसात गोडी-गुलाबीने रहावे. कधी काही कारणाने भांडण झाले तर समाजातील प्रत्येकाचे हे कर्तव्य आहे की भांडणाऱ्यांचे सामोपचाराने मिलन घडवून आणावे.

★ अध्याय ११ च्या वचन ८४, ८५ व ८६ मध्ये पवित्र कुरआनने अशी व्यवस्था दिली आहे की, मोजमाप व वजन करण्यात कमी करू नका. मोजमाप व वजन न्यायपूर्वक पुरेपूर करीत जा. लोकांना त्यांच्या वस्तु कमी देऊ नका. व्यापारात अल्लाहने दिलेली बचतच तुमच्यासाठी उत्तम आहे.

उपरोक्त वचनात व्यापारात, विनिमयात अथवा सामान्य मोजमाप वजन तोलण्यात प्रामाणिकता व विवेकाचा प्रयोग करण्याचा आदेश आहे. प्रामाणिकपणे कमविलेली 'बचत'च उत्तम व कल्याणकारी असते, असे पवित्र कुरआचे मत आहे.

# ५ - उपसंहार

नैतिकतेच्या अनेक गोष्टी, अनेक सिद्धांत आणि अनेक उदाहरणे व अंतर्कथा दिव्य कुरआनमध्ये स्पष्टपणे जागोजागी आढळतात. यात त्यांचे योग्य विवेचन सुद्धा दिले गेले आहे आणि त्यांचे परिणाम सुद्धा स्पष्टपणे सांगितले गेले आहेत.

★ पवित्र कुरआनचे अध्याय २४ च्या वचन ३५ मध्ये सांगितले गेले आहे की, अल्लाह पृथ्वी व आकाशाचा प्रकाश आहे. त्याच्याच प्रकाशाने संपूर्ण ब्रह्मांड प्रकाशित आहे. संपूर्ण जगात त्याचीच छबी व्याप्त होत आहे. तो सर्वव्यापी आहे. तोच आहे जो सर्वत्र कल्याणरूप होऊन वसतो. तोच ब्रह्मांडीय चेतनेचा स्त्रोत आहे.

★ अध्याय ३ च्या वचन १०३ मध्ये सांगितले आहे की सर्वांनी मिळून एकत्रितपणे अल लाहची दोरी मजबूत धरा आणि फूट पडू देऊ नका. अल्लाहने तुमची हृदये परस्पर एकमेकाशी जोडली आहेत. तुम्ही त्याच्या कृपेने आपसात भाऊ-भाऊ आहात.

म्हणून नैतिकतेची, सदाचरणाची अशी गरज आहे की जेव्हा अल्लाह, सर्वव्यापी आहे, सर्वात आहे तेव्हा आमचे प्रेमदेखील सर्वांशी असणे आवश्यक आहे. आपले स्वत:चे कुटुंब, आपली स्वत:ची जात व आपल्या स्वत:च्या देशापर्यंतच प्रेम सीमित असता कामा नये. त्यानुसार आचरण सुद्धा 'सर्वजन सुखाय व सर्वजन हिताय' ठेवले पाहिजे. विश्व बंधुत्वाच्या भावनेनुसार आचरण ठेवणे आमचे कर्तव्य आहे.

पवित्र कुरआनमध्ये दर्शविलेल्या नैतिकतेच्या उदात्त स्वरूपाला आम्ही आनंदाने समर्थन दिले पाहिजे, आणि याच्या औचित्य व महत्तेचा पूर्णपणे स्वीकार केला पाहिजे. हे केवळ वाचनीय, मननीयच आहे असे नव्हे तर अनुकरणीय व अनुसरणीय सुद्धा आहे. प्रेषित (स.) यांनी सोपविलेला हा अमूल्य वारसा असतानादेखील आज आमच्या मानव व मानवतेच्या पतनाचे एकमेव कारण असे राहिले आहे की आम्ही त्याची उपेक्षा केली.

त्याचे उपदेश, त्याच्या शिकवणीवर अपेक्षित लक्ष केंद्रित केले नाही. त्याला शाईने लिहिलेला कागदांचा एक सामान्य गठ्ठा आम्ही समजलो. होय, ज्या लोकांनी याला अल्लाहच्या पवित्र कलाम, ईश्वराची पवित्र वाणी समजून याचा आदर केला, याला आपल्या व्यावहारिक जीवनात व्यक्त केले त्यांना इहलोक व परलोकात सफलता अवश्य प्राप्त झाली. ते धन्य होत.

दिव्य कुरआन मनुष्याची त्रिविध मानसिकता - सत्व, रजस्, तमस् धारण करणाऱ्या लोकांच्या प्रवृत्तीनुसार नैतिकतेचे, सदाचरणाचे त्रिविध स्वरूप सुद्धा प्रस्तुत करतो. यातील संदेश पृथ्वीतलावरील प्रत्येक मानवासाठी विकासाचा राजमार्ग खुला करतो.

★ अध्याय ४ च्या वचन ३६ मध्ये सांगितले आहे की अल्लाह घमेंडखोर, गर्व करणारे, ऐटीने मिरवणाऱ्या लोकांना पसंत करीत नाही. अध्याय ३१ च्या वचन १८ मध्ये म्हटले आहे की धरणीवर ऐटीने मिरवू नकोस. अल्लाह कोणत्याही आत्मप्रशंसा करणाऱ्याला पसंत करीत नाही. अध्याय १९ मध्ये परामर्श दिला गेला आहे की धरणीवर सरळ, साध्या चालीने चला आणि आपला आवाज विनम्र व खालच्या पट्टीत ठेवा.

वरील उपदेश सामान्यपणे सर्व लोकांसाठी आहे, परंतु विशेषतः त्या लोकांसाठी आहे जे सत्वप्रधान, देवमाणसासारख्या प्रवृत्तीचे आहेत. त्यांना ही वाणी विशेषतः उपदेश देते की आपली घमेंडी, गर्व, अहंकारव अभिमानाचे दमन करा, त्यांना नियंत्रित करा. नाहीतर गर्वामुळे सत्वप्रधान प्रवृत्तीची माणसेदेखील आपल्या स्थानापासून दूर जाऊ शकतात. हा त्यांच्यासाठी विशेष इशारा आहे.

★ अध्याय २ च्या वचन ३ मध्ये जकात देणे, दान देण्यास माणसाचे कर्तव्य (फ़र्ज) म्हटले आहे. पवित्र कुरआनपासून मार्गदर्शन प्राप्त करण्यासाठी अल्लाहच्या मार्गात जकात (शंभर रुपयामागे अडीच रुपये दान) देणे, दान करणे आवश्यक म्हटले आहे. वचन २७२ आणि २७३ मध्ये सांगितले आहे की कृत्याने माणसाचे 'स्वकल्याण'

होते. दुसऱ्याच्या कल्याणाला यात गौण स्थान आहे. अध्याय ३ च्या वचन ९२ मध्ये म्हटले आहे की मनुष्य 'नेकी' (पुण्यशील) च्या दर्जाला तोपर्यंत पोचू शकत नाही जोपर्यंत तो अल्लाहने दिलेल्या त्या वस्तूमधून खर्च करीत नाही, जकात देत नाही, दान देत नाही. त्यांचा त्याग करीत नाही ज्या त्याला अत्यंत प्रिय आहेत.

यावरून स्पष्ट झाले की, 'अल्लाहने दिलेल्या वस्तु' काही भौतिक आहेत तर काही अभौतिक, काही दैविक आहेत तर काही आध्यात्मिक किंवा आत्मिक. यांच्यापैकी काहींचा स्वभाव आधिभौतिक आहे. काहींचा आधिदैविक तर काहींचा आध्यात्मिक आहे. कृषि व उद्योगांचे उत्पादन, उद्यानासाठी उत्पन्न, पशु-पक्षी, मुद्रा, वैभवाचे अन्य साधन वगैरे भौतिक आहेत. बळ, बुद्धि विद्या वगैरे अभौतिक आणि सामाजिक असूनदेखील दैविक आहेत. श्रम आणि समय (जीवन) अभौतिक आहेत. हे सर्व माणसाला प्रिय आहेत. एखादी कमी, एखादी अधिक व एखादी सर्वाधिक या सर्व प्रकारच्या वस्तूंची जकात अल्लाहच्या मार्गात देणे मनुष्यासाठी परम कल्याणकारी असते. जितकी अधिक प्रिय वस्तूची जकात दिली जाईल तितकेच उत्तम आहे. सर्वाधिक प्रिय वस्तूची जकात सर्वोत्तम आहे. आमच्या मते या सर्व वस्तूत 'अहम्' मनुष्याला सर्वाधिक प्रिय आहे. म्हणून 'अहमची जकात अल्लाहच्या मार्गात देणे सर्वोत्तम आहे. याचेच नाव अल्लाहच्या मार्गात, ईश्वरासाठी, पूर्णपणे आत्मसमर्पण करणे सुद्धा आहे. याचेच नाव 'इस्लाम' आहे. याच 'अहम्'ची जकात हजरत इब्राहीम (अलै.) यांनी अल्लाहच्या मार्गात दिली होती, पूर्णतः आत्मसमर्पण केले होते आणि परिणामतः ते 'ख़लीलुल्लाह' (अल्लाहचे मित्र) झाले. भौतिक वस्तूमध्ये 'पुत्र' सर्वाधिक प्रिय असतो. हजरत इब्राहीम (अलै.) यांनी आपल्या पुत्राची सुद्धा जकात अल्लाहच्या मार्गात दिली. ज्यावर त्याने आपली सहमती सहर्ष व्यक्त केली. अल्लाहने ही जकात, हे समर्पण, ही कुर्बानी फार पसंत केली. ही अल्लाहच्या मार्गात त्यांची एक श्रेष्ठ कुर्बानी जगात महान त्याग व महान दान होते. धन-दौलतीच्या जकातचे महत्व सर्वांना परिचित आहे. विद्या

जकात देणे, विद्यादान, श्रमाची जगात, श्रमदानाच्या उपयुक्ततेने सर्वसामान्य लोक परिचित आहेत. म्हणून अल्लाहने दिलेल्या व आम्हाला प्रिय असलेल्या वस्तूंची जकात, दान देणे व त्यांचा त्याग करणे मानवासाठी कल्याणकारी सिद्ध होते. मात्र त्याला अट अशी की ते समाजाच्या हितासाठी अथवा अल्लाहच्या मार्गात असावे. क्रोधाची जकात देण्याचा अर्थ असा की माणसाने दुसऱ्यासाठी दया दाखविणारा बनावे. लोभाची जकात देण्याचा अर्थ असा आहे की मनुष्यात अधिकाधिक दान देण्याची भावना उत्पन्न व्हावी. ईर्ष्येची जकात देण्याचे तात्पर्य असे आहे की मानवात सर्वांचा हितचिंतक बनण्याच्या भावनेचा उदय व्हावा. त्याने सर्वांच्या कल्याण व मांगल्याची इच्छा करू लागावे. हे गुण एखाद्या माणसात आले तर त्याच्यात अन्य सर्व अपेक्षित गुण आपोआप उत्पन्न होतील. आपोआप मन शुद्ध होईल व बुद्धि निर्मळ व विवेकशील बनेल आणि आत्मा प्रकाशमान बनेल. मग कोणत्याही शुभ कार्यासाठी तो आपली प्रिय वस्तु सहर्ष व सहजपणे खर्च करील.

★ अध्याय ९ च्या वचन १०३ मध्ये जकात देणे व दान करण्यास मनाच्या शुद्धिकरणाचे एक साधन म्हटले आहे. अध्याय २७ च्या वचन ३ मध्ये जकात देण्यास दीन (जीवनपद्धती) वर आरूढ होण्यासाठी पहिली अट असल्याचे म्हटले आहे. दीन (जीवनपद्धती) आध्यात्मिकतेवर आधारित आहे. वरील गोष्टीने स्पष्ट होते की जकात देण्याचा मनाशी व आध्यात्मिकतेशी फार जवळचा संबंध आहे.

वरील तथ्ये दृष्टिसमोर ठेऊन आम्हाला असे लिहिणे भाग पडते की आम्ही जकात आमच्या बांधवांची भूक मिटविण्यासाठी, त्यांची गरीबी व अभावांना दूर करण्यासाठी व त्यांच्या गरजा भागविण्यासाठी देत नाही. जकात अल्लाहची, ईश्वराची इच्छा व आदेशाची अम्मलबजावणी करण्यासाठी त्याच्या मार्गात समाजाच्या हितासाठी नि:स्वार्थ भावनेने देतो. यावर प्रसन्न होऊन अल्लाह आम्हाला आमचे

भले होण्याचे आश्वासन देतो. वरील व्यवस्था विशेषत: रजस् प्रवृत्तीच्या लोकांसाठी उपदेश आहे. अशा लोकांना हे सांगणे योग्य आहे की आपल्या संकीर्ण स्वार्थपर मनोभावनेच्या आहारी न जाता दानशील बनून सर्वांना आपले समजा. याच उद्देशाच्या पूर्ततेसाठी अध्याय ५७ चे वचन ११, अध्याय ५८ चे वचन १२ आणि अध्याय ९ चे वचन १०३ मध्ये सदका (दान) ख़ैरात (दान) देण्यास आत्मविकास आणि जन्नत (स्वर्ग) प्राप्तीचे साधन म्हटले गेले आहे.

★ अध्याय २८ च्या वचन ५४ मध्ये म्हटले गेले आहेकी अपकाराचा बदला उपकाराने द्या. अध्याय ४१ च्या वचन ३४ मध्ये सुद्धा हाच उपदेश दिला गेला आहे की अपकाराला उपकाराने दूर करा. अध्याय ४२ च्या वचन ३७ मध्ये राग आल्यास क्षमा करण्याचा आदेश दिला गेला आहे. वचन ४३ मध्ये सब्र (संयम) करणे, अपराध्याला क्षमा करणे मोठ्या साहसाचे कार्य म्हटले गेले आहे.

नैतिकतेची ही व्यवस्था विशेषत: तामसी प्रवृत्तीच्या अशा लोकांना उपदेश देण्यासाठी केली गेली आहे जे राक्षसासमान, सैतानाप्रमाणे अपरिमित अनर्थ व अन्याय करण्याची शक्ती बाळगतात. त्यांच्यासाठी या दिव्य वाणीचा संदेश आहे की दयावान, कृपाशील बना. त्यांच्यासाठी देखील दयाळू व्हा ज्यांच्यासाठी तुम्हाला निर्दयी बनण्याचा प्रसंग येतो. हाच शुभ संदेश पवित्र कुरआन आम्हा सर्वांना देतो व आशा बाळगतो की आम्ही आपल्या जीवनात त्याची अंमलबजावणी करू.

★ अध्याय ४ च्या वचन १ मध्ये सांगितले आहे की जगातील सर्व मानव एकच आई (हजरत हौवा) व एकाच पित्याची (हजरत आदम अलै.) संतती आहेत. अशा प्रकारे अल्लाहने एकाच जीवा (हजरत आदम अलै.) पासून सर्व मानवांना निर्माण केले. म्हणून जगात एकाच मानवजातीचे लोक वसतात. पवित्र कुरआनची ही व्यवस्था सर्वांना भावा-भावाचा समान दर्जा प्रदान करते. म्हणून सर्वांनी एकमेकाला सहाय्य करावे. हाच पवित्र कुरआनचा सुनिश्चित आदेश आहे. सर्व

जगातील मनुष्याची उत्पत्ती एकाच जीवापासून (हजरत आदम अलै.) असल्याचा उल्लेख अध्याय ७ च्या वचन १८९ मध्ये केला गेला आहे. अध्याय ४९ च्या वचन १३ मध्ये सुद्धा एक पुरुष व एका स्त्रीपासून संपूर्ण मानवजातीची उत्पत्ती झाल्याचे सांगितले आहे. यात म्हटले गेले आहे की जात व वंश केवळ ओळखण्यासाठी निर्माण केले गेले आहेत. येथे 'वसुधैव कुटुंबकम'च्या धारणेची स्थापना झाली आहे.

★ अध्याय २८ च्या वचन १७ मध्ये स्पष्ट वर्णन केले गेले आहे की अपराधी, अत्याचारी, अन्यायी, आततायींचे सहाय्यक, मित्र व पक्ष घेणारे कधीच बनू नका, कारण अल्लाह तुम्हाला सहाय्य करतो, परंतु तो अत्याचारी, अपराधी व सैतानी कृत्ये करणाऱ्यांना कदापि मदत करीत नाही. म्हणून अपराधी व अत्याचाऱ्यांच्या बाजूला झुकू नका. त्यांचे समर्थन करू नका.

अशा प्रकारे नैतिकतेच्या अनेक पैलूंवर विस्ताराने प्रकाश टाकून पवित्र कुरआन आपल्या कर्तव्याची इतिश्री झाल्याचे मानीत नाही. वर्तमान काळात जेव्हा विश्वात मानवता विक्षुब्ध व अशांत आहे, तेव्हा नैतिकतेची उपयुक्तता केवळ आवश्यकच नव्हे तर अनिवार्य सुद्धा असल्याचे सांगतो. यास मानवधर्माच्या रूपात स्वीकार करण्यावर बळ देतो. मॅथ्यू आरनॉल्ड सुद्धा असे मानतात की धर्म एक उच्चतर प्रकाशमान नैतिकताच आहे. विभिन्न देश व विभिन्न जातींसाठी धर्माचे नैतिक स्वरूप समान रूपाने स्वीकार्य आहे. याचे अवलंबन करून जीवन सुगठित केल्याने प्रेम, औदार्य, सौहार्द, धैर्य, साहस, दया आणि करुणासारख्या मानव-हृदयाच्या सहज सद्‌वृत्तींचा विकास होतो. यामुळेच अलौकिक समजले जाणारे गुण व मापदंडांना लौकिक बनवून मानव कल्याणाच्या सद्‌भावनेच्या प्रसार-प्रचाराचे कठीण कार्य सोपे, सरळ बनते. इस्लाम धर्म व दिव्य कुरआनचा सुद्धा हाच उद्देश आहे.

**❊ समाप्त ❊**